


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्नसन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१/२४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११००४ (दूरध्वनी ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : कल्याण काळे, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

# ' लिटरेचर ' शब्दाचा नवा अर्थ

ज्ञानेश्वरी सप्तशताब्दी महोत्सव गेलं वर्षभर खूप गाजला. नुकताच त्या महोत्सवाचा सांगता समारंभही वाजत-गाजत संपन्न झाला. शासकीय समित्यांपासून भोळ्या-भाबड्या भाविकांपर्यंत अनेकजण या महोत्सवात बिल्वपत्रं टाकून गेले. प्रत्येकजण वेगवेगळ्या हेतूनं !

या वर्षभरात ज्ञानेश्वरीचं पुनःस्मरण अनेक अंगांनी झालं. तिच्यातील वाङ्मयीन सौंदर्याचा पुनरास्वाद घेतला गेला. तत्त्वज्ञानाची चिकित्सा झाली. वारकरी पंथ आणि ज्ञानेश्वरी यांचे संबंध पुन्हा नव्या प्रकाशात तपासले गेले. भाविकांनी भोळ्या भावानं ज्ञानेश्वरी-पारायण-यज्ञ केले.

ज्ञानेश्वरीच्या निर्मितीमागील अनेक हेतूंपैकी एकाकडे मात्र या गदारोळात दुर्लक्ष झाले. तो हेतू म्हणजे स्वभाषाभिमान-संवर्धन. बी कवींनी ज्ञानेश्वरांचे वर्णन ' त्या बड्या बंड-वाल्यांत ज्ञानेश्वर माने पहिला ' असं केलं आहे. ज्ञानेश्वरांनी जी अनेक बंडं केली त्यातील एक बंड भाषिक होतं. संस्कृत भाषेत बंदिस्त असलेली ज्ञानगंगा करुणाभावाने मराठीत आणून त्यांनी ती सामान्य जनांपर्यंत पोहोचवली. असं करण्यामागे केवळ व्यावहारिक सोय नव्हती. तेराव्या शतकात नुकत्याच घडू लागलेल्या मराठीच्या अभिव्यक्ती क्षमते-बद्दलचा विश्वास आणि स्वतःच्या संज्ञापनकौशल्याविषयीचा आत्मविश्वास ही या घटने-मागील प्रेरणास्थानं होती.

माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिकें । परि अमृतातें हीं पैजेंसीं जिंके । ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेळवीन ।।

-या ओवीमागील अर्थाचे पदर नीट समजावून घ्यायला हवेत.

ज्ञानेश्वरीच्या निर्मितीला आता सातशे वर्षं होऊन गेली. या सातशे वर्षांत समाजवास्तव बदलले आणि ज्ञानेश्वरीतील बरेच संदर्भ धूसर झाले. ज्ञानेश्वरीशी निगडित असलेला ' स्वभाषाभिमान 'ही धूसर झाला आहे असं वाटायला लावणारे प्रसंग सभोवताली वारंवार घडताना दिसतात. मातृभाषेबद्दलचा अभिमान आणि आत्मविश्वास यांची जागा आज न्यूनगंडाने बळकावलेली दिसते.

माझ्या दूरच्या नात्यातील बहिणीची दोन्ही मुलं इंग्रजी माध्यमाच्या शाळेत शिकतात. त्यामुळे त्यांच्या घरात फक्त संभाषणच नाही, तर वादविवादही इंग्रजीतून चालतात. माझी बहीण मराठी शाळेत शिकलेली असल्यामुळे तिला या वादविवादात पूर्वी सफाईनं भाग घेता

यायचा नाही. आता सवयीनं ती पण इंग्रजी बोलायला लागली आहे. एकदा मी त्यांच्या घरी गेलेली असताना चहाच्या टेबलवर चर्चा रंगल्या होत्या. माझी बहीण इंग्रजीतून चाललेल्या त्या चर्चेत चतुरपणे भाग घेत होती. माझे मेव्हणे माझ्याकडे बघून म्हणाले, 'तुझी खेडवळ बहीण कशी इंग्रजी बोलतीय बघ!' मेव्हण्यांचा चेहरा समाधानानं फुलून आला होता. बहिणीलाही हे वाक्य ऐकून कृतकृत्य झाल्यासारखं वाटलं.

दि. १६ जूनच्या **लोकसत्तेत** आलेलं एक स्फुट लक्षात राहाण्यासारखं आहे. त्याचा गोषवारा असा होता. एक बाई मराठी साहित्यामध्ये संशोधन करत होत्या. आपण मराठी विषयात संशोधन करतो, हे सांगताना त्यांना कमीपणा वाटायचा. म्हणून आपण 'लिटरेचर' मध्ये संशोधन करतो, असं त्या सर्वांना सांगत असत. ('झलक पुण्याची' **लोकसत्ता**, दि. १९९१-०६-१६.)

हे वाचताना एका ओळखीच्या प्राध्यापकांची मला आठवण झाली. हे प्राध्यापक मराठी शिकवतात. त्यांना कामासाठी बरेच वेळा डेक्कन क्वीननं मुंबईला जावं लागतं. प्रवासात कोणी त्यांना काय करता असं विचारलं, तर ते सांगतात, मी 'लिटरेचर' शिकवतो.

हे काहीच नाही, यापेक्षाही एक गंमतीची घटना सांगण्यासारखी आहे. आकर्षक व्यक्तिमत्त्व असलेल्या एक मराठीच्या प्राध्यापिका माझ्या ओळखीच्या आहेत. एकदा काही कामासाठी त्या माझ्या घरी आल्या होत्या. त्यावेळी दुसरे एक गृहस्थ एका वेगळ्या कामासाठी माझ्या घरी येऊन बसलेले होते. प्राध्यापिकाबाई माझ्याशी बोलून आणि काही पुस्तकं घेऊन गेल्या. त्या गेल्यावर या गृहस्थांनी त्या कोण, काय करतात इत्यादी चौकशी केली. त्या मराठीच्या प्राध्यापिका आहेत असं मी सांगितल्यावर ते एकदम म्हणाले, "अरेच्या! त्यांच्याकडे बघून त्या दुसरा कुठला तरी विषय शिकवीत असतील असं वाटतं." मला माझा राग झाकून ठेवणं अवघड झालं. मी त्यांना म्हटलं, 'मराठीच्या प्राध्यापकाला आकर्षक व्यक्तिमत्त्व असू नये, असा काही नियम आहे का?'

त्या गृहस्थांचंही फार चुकलं नाही म्हणा. फक्त व्यावहारिक फायद्या-तोट्यांवर नजर ठेवून चालणाऱ्या आजच्या जगात लौकिकदृष्ट्या फायदेशीर नसलेल्या मराठीसारख्या विषयाकडे 'स्मार्ट' माणसं कशाला वळतील? आवडीच्या विषयाच्या अध्ययन-अध्यापनात आयुष्य घालवण्याचे दिवस आता इतिहासजमा झाले.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी इंग्रजी भाषेला 'वाघिणीचे दूध' असं नाव दिलं. वाघिणीचं दूध पिण्यात मश्गूल असलेल्या आपल्या उच्चभ्रू आणि सुशिक्षित वर्गाला त्यांच्या स्वभाषाभिमानाचं मात्र विस्मरण झालं. चिपळूणकरांना पुनरुज्जीवनवादी ठरवल्यानंतर त्यांचं स्वभाषाभिमानाचं सूत्र आपल्या जगण्यापासून दूर ठेवण्याची तार्किक सोयही झाली.

काही वर्षांपूर्वी 'मराठी अभ्यास परिषदे'ने पुण्यामध्ये शिक्षणाच्या माध्यमाविषयी एक परिसंवाद आयोजित केला होता. 'ज्ञानभाषा' म्हणून इंग्रजी शिकणे आवश्यक असले, तरी मुलांना प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मातृभाषेतूनच द्यावं, असा निष्कर्ष त्या परिसंवादातून निघाला. समारोपाच्या वेळी बहुजनसमाजातील एक कार्यकर्ते तावातावाने व्यासपीठाकडे गेले आणि म्हणाले, 'हे बरं आहे तुमचं! आमच्या समाजाची मुलं आणि तळागाळातली शोषित मुलं मराठी माध्यमाच्या शाळेत शिकणार. आणि तुम्ही स्वतःच्या मुलांना इंग्रजी शाळांत शिकवून त्यांना सगळ्या संधी मिळवून देणार. कोण ऐकणार हो तुमची तत्त्वं?'

उच्चवर्णीयांच्या ढोंगीपणाबद्दल या कार्यकर्त्यांना आलेली चीड योग्य आणि स्वाभाविकच होती. त्यांचा राग मराठी भाषेवर नव्हता. इंग्रजी माध्यमाच्या शाळेत शिकल्यामुळे लौकिक यश व भौतिक सुबत्ता मिळते असं पक्कं गणित या कार्यकर्त्यांच्या डोक्यात होतं. इंग्रजी येत असल्यामुळे एका विशिष्ट वर्गातील मूठभरांना मिळणाऱ्या मानमान्यतेला त्यांचा विरोध होता. परभाषाप्रभुत्वाचा आग्रह धरून आर्थिक असमतोल आणि सामाजिक विषमता यांना खतपाणी मिळत असेल, तर स्वभाषेबद्दल अभिमान जागृत करणं व व्यवहारात तो टिकवून ठेवणं फार अवघड होऊन बसतं.

भारतासारख्या आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या व विषमतेनं ग्रासलेल्या बहुभाषी देशाचे भाषिक प्रश्न सोडवणं एका गुंतागुंतीचं काम आहे. भाषिक दंगली घडवून आणणारा स्वभाषेबद्दलचा आंधळा अभिमान आपल्याला परवडणार नाही, किंवा स्वभाषेबद्दलचा कमालीचा न्यूनगंड समाजात पसरूनही चालणार नाही. कारण भाषासंस्कृतीची जोपासना करत असते. मातृभाषेच्या अभिमानातून अस्मिता जोपासली जाते. मानानं जगण्यासाठी ती आवश्यक असते.

ज्ञानेश्वरी सप्तशताब्दी वर्षात मराठी माणसाच्या मनात स्वभाषाभिमान जागृत होवो, असं पसायदान मागून केवळ स्वभाषेबद्दलचा अभिमान जागृत होणार नाही. त्यासाठी जीवनाशी संबंधित असलेल्या क्षेत्रांत भाषिक नियोजन होणं आवश्यक आहे.

भाषा आणि साहित्य यांच्या अध्ययनाकडे आज हुशार विद्यार्थ्यांचा कल नाही. अगदी इंग्रजी साहित्याच्या अध्ययनाकडेही नाही. गुणवत्ता यादीत आलेल्या सर्वांना डॉक्टर किंवा इंजिनिअर व्हायचं असतं. देशातील हुशारी केवळ तंत्रज्ञान आणि उद्योग-व्यवसाय यांकडे जाऊन कसं चालेल? केवळ तंत्रज्ञानाचा विकास व अर्थोत्पादन म्हणजे मानवी जीवन नव्हे. सुसंस्कृत जगण्यासाठी साहित्य, कला, इतिहास, मानव्यविद्या, प्राच्यविद्या, सामाजिक विज्ञानशाखा अशा विविध क्षेत्रांत नवनिर्मिती व संशोधन होणे आवश्यक असते. मानवी संस्कृती अशा विविध अंगांनी बहरत असते. या क्षेत्रांकडे दुर्लक्ष झाले आणि केवळ तंत्रज्ञानाचा एकांगी विकास झाला तर राजकीय आणि आर्थिक दिवाळ-

खोरीच्या पाठोपाठ सांस्कृतिक दिवाळखोरीलाही आपल्याला सामोरे जावे लागेल. एका माजी मुख्यमंत्र्यांनी मानव्य महाविद्यालये बंद करण्याविषयी केलेली विधाने किंवा एकामागोमाग बंद पडत चाललेली वाङ्मयीन व सामाजिक नियतकालिकं, प्रकाशन व्यवसायात नुकतीच आलेली मंदीची लाट ह्या घटना म्हणजे या सांस्कृतिक दिवाळखोरीच्या पूर्वसूचनाच आहेत.

ही दिवाळखोरी रोखायची असेल आणि संस्कृती जोपासण्याचं महत्त्व मान्य असेल, तर भाषा, साहित्य, कला, व मानव्यविद्या यांच्या अभ्यासाला व संशोधनाला उत्तेजन देण्याचे प्रयत्न सरकारी व खाजगी पातळीवर नियोजनपूर्वक झाले पाहिजेत. हुशार विद्यार्थी या विषयांकडे वळतील, त्यांना आर्थिक स्थैर्याची हमी मिळेल, हे पाहिले पाहिजे. साहित्य व भाषा यांच्या अभ्यासाला एकूण ज्ञानव्यूहात व समाजात मानाचं स्थान व व्यावहारिक महत्त्व मिळालं पाहिजे. मराठी भाषा व साहित्यही याला अपवाद असता कामा नये.

हे चित्र जेव्हा निर्माण होईल तेव्हा मराठीमध्ये संशोधन करणाऱ्या आणि मराठीचे अध्यापन करणाऱ्या व्यक्तीला ' मी ' लिटरेचर ' शिकतो/शिकवतो ' असं घाबरट उत्तर देण्याची गरज राहणार नाही.

**अंजली सोमण**

**कानी आलेले संवाद**

' पण सर... ' महाविद्यालयीन विद्यार्थी.

' तू आपल्या बापाला घेऊन ये. ' उपप्राचार्य.

* *

' उपप्राचार्य अपमानकारक बोलतात त्यामुळे त्यांना काढून टाका. ' विद्यार्थी शिष्टमंडळ हकिगत ऐकल्यावर प्राचार्य म्हणतात. ' मी चौकशी करून मग काय ते ठरवतो. '

* *

चौकशी केल्यानंतर प्राचार्य विद्यार्थ्यांना म्हणतात. ' उपप्राचार्य तसं म्हणाले हे अगदी खरं. पण त्यात अपमान करण्याचा त्यांचा हेतू नव्हता. ते नगरकडले खिस्ती गृहस्थ आहेत. ही मंडळी तर प्रत्यक्ष देवाला आकाशातला बाप म्हणतात. बाप हा शब्द त्यांनी अनादराने वापरलेला नाही. '

विद्यार्थ्यांची समजूत पटली, पण एकाने शंका काढली. ' सगळं आम्हाला पटलं. पण आमच्या अशिक्षित वडलांना कसं पटणार ? '

' वडील अशिक्षित असतील तर पटण्याचा प्रश्न येणार नाही. कारण त्यांना " तीर्थरूपांना पाचारण कर " यापेक्षा " बापाला बोलव " हेच समजेल. ' इति प्राचार्य.

विद्यार्थी निरुत्तर.

सदर ' पुण्याची क्षितिजे ' सकाळ ( पुणे ) १९९१. ०४.२०

# नोम चॉम्स्की यांचा भाषावैज्ञानिक सिद्धांत

## ( पूर्वार्ध )

**मिलिंद स. मालशे**

### रूपरेषा

१. प्रास्ताविक : [ अ ] नोम चॉम्स्की : जीवनपट व कार्य
[ आ ] अमूर्तीकरणांचे भाषाभ्यासातील स्थान
२. अमेरिकन संरचनावाद : [ अ ] भाषा म्हणजे काय ?
[ आ ] भाषाविज्ञान म्हणजे काय ?
३. चॉम्स्की यांनी केलेले खंडन
४. चॉम्स्की यांचा सिद्धांत : [ अ ] भाषिक ज्ञान
[ आ ] व्याकरणाचे निर्देशनसामर्थ्य
[ इ ] रचनांतरण

### १. प्रास्ताविक

**[ अ ] नोम चॉम्स्की : जीवनपट व कार्य**

नोम चॉम्स्की याचा जन्म ७ डिसेंबर, १९२८ रोजी फिलडेल्फिया, पेनसिल्वेनिया येथे ज्यू कुटुंबामध्ये झाला. शालेय शिक्षण फिलडेल्फिया येथे, तर महाविद्यालयीन शिक्षण पेनसिल्वेनिया विद्यापीठात झाले. या विद्यापीठातून त्यांनी बी.ए. व एम्. ए. या पदव्या मिळविल्या. १९५१ ते १९५५ या दरम्यान हार्वर्ड विद्यापीठात फेलोशिप घेऊन त्यांनी संशोधन केले आणि १९५५ मध्ये पेनसिल्वेनिया विद्यापीठाची पीएच्.डी. पदवी संपादन केली. १९५५ पासून मॅसच्यूसट्स् इन्स्टिट्यूट ऑव्ह टेक्नॉलजी ( एम्. आय्. टी. ) या संस्थेत ते अध्यापन व संशोधन करीत आहेत, आक्सफर्ड, केम्ब्रिज, लंडन, यू. सी. एल्. ए., प्रिन्सटन, हार्वर्ड, इत्यादी अनेक विख्यात संस्थांनी त्यांना अभ्यागत प्राध्यापक वा संशोधक म्हणून निमंत्रित करून त्यांचा बहुमान केलेला आहे.

गेल्या सुमारे साडेतीन दशकांमध्ये एक आघाडीचा विचारवंत म्हणून चॉम्स्की यांना मान्यता मिळालेली आहे. त्यांनी राजकीय प्रश्नांवर जे लेखन केले आहे, त्याचा उल्लेख सर्वप्रथम करायला हवा. आधुनिक समाजाचा एक जागरूक नागरिक व विचारवंत म्हणून

चॉम्स्की यांचा सर्वसामान्य वाचकाला जो परिचय आहे, तो त्यांच्या जहाल राजकीय लेखनामुळे आहे. आपल्या राजकीय लिखाणामधून त्यांनी 'अमेरिकन साम्राज्यवादा' वर घणाघाती हल्ला सातत्याने चढवलेला आहे. American Power and the New Mandarins (1969), For Reasons of State ( 1973 ) व The Backroom Boys ( 1973 ) यांसारख्या पुस्तकांमधून विएतनाम, क्यूबा, इत्यादी प्रकरणांमध्ये अमेरिकन सरकारची भूमिका व कृती कशी अनैतिक होती, ते सिद्ध करून त्यावर जळजळीत टीका केलेली आहे, तर The Political Economy of Human Rights ( 1979 : एडवर्ड हर्मन यांच्या सहकार्याने ), Towards a New Cold war, ( 1982 ) आणि The Fateful Triangle ( 1983 ) या पुस्तकांमधून इस्रेल, इंडोनेशिया, इत्यादी प्रकरणांत, तसेच रशियाने कोरिअन विमान पाडल्याच्या प्रकरणात अमेरिकेच्या मतलबी भूमिकेची चिरफाड केलेली आहे. अगदी अलीकडे आखाती युद्धाच्या संदर्भातही त्यांनी अमेरिकन शासनाच्या दुटप्पी धोरणावर जहाल टीका केलेली आहे. संहाराची महाभयानक शस्त्रास्त्रे बाळगण्याचा प्रश्न असो, अरब-इस्रायल तणाव असो, वा सद्दाम हुसेनचे कुवेत-वरील आक्रमण असो, अमेरिकन शासनाला मुळात परराष्ट्र-शिष्टाईच्याद्वारे होऊ शकणारी तडजोड नकोच आहे; केवळ लष्करी बळाच्या आधारे त्यांना जगावर नवी व्यवस्था लादायची आहे; अशी भूमिका सज्जड पुराव्याच्या आधारे चॉम्स्की यांनी मांडलेली आहे. ( पाहा : Z Magazine, Feb., 1991 या अमेरिकन नियतकालिकातील त्यांचा 'The Gulf Crisis' हा लेख, तसेच Frontline, March 2–15, 1991 या भारतीय पाक्षिकामध्ये प्रसिद्ध झालेली त्यांची मुलाखत. )

राजकारणाच्या क्षेत्रात चॉम्स्की यांचे स्थान भाष्यकार म्हणून आहे, असे म्हणता येईल. भाषाविज्ञानाच्या क्षेत्रामध्ये मात्र त्यांनी टाकलेली भर सैद्धांतिक स्वरूपाची आहे. किंबहुना या क्षेत्रामध्ये मन्वंतर घडवून आणणारा सैद्धांतिक, ही चॉम्स्की यांची प्रमुख ओळख होय. Transformational Generative Grammar (' रचनांतरणात्मक निर्देशनात्मक व्याकरण ') या नावाने त्यांचा सिद्धांत ओळखला जातो. या लेखामध्ये आपण या सिद्धां-ताची चर्चा करणार आहोत.

भाषावैज्ञानिक सिद्धांताबरोबरच भाषेशी संबंधित असणाऱ्या काही तत्त्वज्ञानात्मक प्रश्नांवरही चॉम्स्की यांनी लेखन केलेले आहे. भाषा व मनाची संरचना, भाषा व ज्ञान, भाषा व बाह्य विश्व, इत्यादींसंबंधी त्यांनी केलेले सिद्धांतन तत्त्वज्ञान व मनोविज्ञान या क्षेत्रांतील अभ्यासकांना मौलिक वाटलेले आहे. या संदर्भात चॉम्स्की यांचे पुढील ग्रंथ महत्त्वाचे आहेत : Cartesian Linguistics ( 1966 ), Language and Mind (सुधा. आ. १९७२ ), Reflections on Language ( 1975 ), Rules and

Representations (1980), आणि Knowledge of Language (1986).

मानवी मनाचे स्वरूप आणि मानवी ज्ञान यांविषयी वर्तनवादी (behaviourist) व अनुभववादी (empiricist) भूमिकांचे खंडन करून मानवी मनाच्या निर्मितिशीलतेला केंद्रवर्ती स्थान देणारा एक ज्ञानात्मकतावादी (cognitivist) व काही प्रमाणात विवेकवादी (rationalist) विचारव्यूह चॉम्स्की यांनी आपल्या लेखनामध्ये विकसित केलेला आहे, व ते करीत असताना रने देकार्त या सतराव्या शतकातील फ्रेंच तत्त्वज्ञाच्या सिद्धांताची फेरमांडणी आधुनिक संदर्भात केली आहे. भाषा आत्मसात करण्याची शक्ती माणसाला जन्मजातपणे प्राप्त होणाऱ्या शक्तींपैकी आहे, हे या विचारव्यूहातील मुख्य प्रमेय आहे. भाषाविज्ञान ही ज्ञानात्मकतावादी मनोविज्ञानाची एक शाखा आहे, ही चॉम्स्की यांची भूमिका याच विचारव्यूहाचा एक महत्त्वाचा पैलू आहे.

## [ आ ] अमूर्तीकरणांचे भाषाभ्यासातील स्थान

कोणत्याही वैज्ञानिक अभ्यासासाठी अभ्यासविषयाचे काही विशिष्ट स्वरूपाचे अमूर्तीकरण आवश्यकच असते. आधुनिक भाषाविज्ञानाने भाषा या संकल्पनेचे जे अमूर्तीकरण केलेले आहे, त्याचे स्वरूप आपण लक्षात घ्यायला हवे. एक म्हणजे, संपूर्णपणे एकसंध असा, भाषिक समाज (homogeneous speech community), ही संकल्पना आधुनिक भाषावैज्ञानिकांनी केंद्रवर्ती स्वरूपाची मानलेली आहे. फेर्दिनां द सोस्यूर (१८५७-१९१३) हे आधुनिक भाषाविज्ञानाचे जनक मानले जातात. सोस्यूर यांनी भाषा या संकल्पनेच्या दोन रूपांत भेद केला : एक रूप म्हणजे प्रत्यक्ष, मूर्त भाषिक वर्तन (Parole), म्हणजेच प्रत्यक्ष निर्माण झालेले भाषिक उद्गार वा व्यक्तीव्यक्तीनुसार, प्रसंगाप्रसंगानुसार बदलणारा वाचिक व्यवहार; तर दुसरे रूप म्हणजे या वर्तनामागील पायाभूत आणि अचल स्वरूपाची भाषिक व्यवस्था (langue), या दोन रूपांपैकी भाषिक व्यवस्थेला सोस्यूर यांनी प्राधान्य दिले (Saussure, 1974). भाषिक व्यवस्था ही संकल्पना अमूर्त म्हटली पाहिजे, व या संकल्पनेमध्ये एकसंध असा भाषिक समाज गृहीत धरलेला आहे. लेनर्ड ब्लूमफील्ड या अमेरिकन अभ्यासकाने तर भाषेची व्याख्याच पुढीलप्रमाणे केलेली आहे : एकसंध मानलेल्या भाषिक समाजामध्ये करता येतील, अशी सर्व उच्चारणे म्हणजे भाषा होय (Bloomfield, 1928).

नोम चॉम्स्की यांनी भाषा या संकल्पनेच्या अमूर्तीकरणाकडे विशेष लक्ष दिलेले आहे. त्यांच्या 'भाषिक क्षमता' (linguistic competence) या संकल्पनेमुळे आधुनिक भाषाविज्ञानातील अमूर्तीकरणाला अधिक स्पष्टता व काहीसे वेगळे वळण मिळालेले आहे. सोस्यूर यांनी 'व्यवस्था' या संकल्पनेमध्ये केवळ संरचनेवर लक्ष केंद्रित करून मनःशक्तीसंबंधी





अनुक्रमणिका

काही तत्त्व मांडायचे टाळले होते. चॉम्स्की यांच्या सिद्धांतामध्ये मानवी ज्ञानशक्तींकडे लक्ष वेधलेले आहे. भाषेच्या प्रत्यक्ष वापरामागे–म्हणजे, आकलन व बोलणे या दोन्ही प्रक्रियां-मागे–भाषिक ज्ञान असते; या ज्ञानाशिवाय कोणताही भाषिक व्यापार शक्य होणार नाही, ही भूमिका चॉम्स्की यांच्या सिद्धांतामध्ये केंद्रस्थानी आहे. ( Chomsky, 1965 : 4: 1972:115—17 ).

दुसरे म्हणजे, भाषा या संकल्पनेला जनमानसामध्ये जे सामाजिक–राजकीय व त्यामुळे मूल्यमापनात्मक परिमाण असते, त्याला फाटा दिल्याखेरीज वैज्ञानिक अभ्यासाला आवश्यक असणारी सुस्पष्ट स्वरूपाची संकल्पना आपल्या हाती लागणार नाही. अमुक अमुक भाषा एकमेकींपेक्षा भिन्न आहेत, असे आपण म्हणतो, तेव्हा खरे पाहता सामाजिक–राजकीय निकषच आपण वापरतो. खास ‘ भाषिक ’ स्वरूपाचे निकष काही आपण वापरीत नाही. जर्मन भाषा डच या भाषेपेक्षा वेगळी मानली जाते, ती मुख्यतः सामाजिक व राजकीय कारणांमुळे मानली जाते. म्हणजे, जर्मनी व हॉलंड हे देश वेगळे आहेत, या सामाजिक-राजकीय निर्णयामुळेच मुख्यतः या दोन भाषा वेगळ्या ठरतात. परंतु या भाषांच्या अंतर्गत स्वरूपाकडे लक्ष दिल्यास काही वेगळेच चित्र दिसते. जर्मन भाषेच्या म्हणून मानल्या गेलेल्या काही बोली डच भाषेच्या काही बोलींनाच रचनात्मकदृष्ट्या खूप जवळच्या असलेल्या आढळतात, जर्मन भाषेच्या इतर बोलींशी त्याचा संबंध नाममात्रच आहे. ‘ चिनी ’ ही एक भाषा असून तिच्या वेगवेगळ्या बोली आहेत, असे आपण सर्व-सामान्यपणे मानतो, ते चीन हा सामाजिक व राजकीय दृष्ट्या एक देश असल्यामुळे मानतो. परंतु काटेकोरपणे बोलायचे, तर ही बोलीभिन्नता इतकी मोठी आहे, की तिला भाषांतर्गत भिन्नता मानण्याऐवजी भाषाकुलांर्गत भिन्नता म्हणायला हवी. रोमान्स-भाषाकुलातील भाषा-भाषांमध्ये वा द्रविड कुलातील भाषाभाषांमध्ये संरचनात्मक दृष्ट्या ज्या प्रकारची भिन्नता आढळते, त्या प्रकारची भिन्नता येथे आहे. अर्थात एक देश, म्हणजे एक भाषा, असे सामाजिक–राजकीय समीकरण नेहमीच अस्तित्वात असेल, असेही नाही. उदाहरणार्थ, भारत हा देश एक असूनही ( खरोखर आहे काय ? ) तेथे एकाच भारतीय भाषेच्या अनेक बोली आहेत, असे काही आपण मानत नाही. तेव्हा सामाजिक-राजकीय निकष हे भाषेचे स्वरूप निश्चित करण्याच्या दृष्टीने भाषावैज्ञानिकाच्या कामाचे नाहीत. एक म्हणजे, ते सुनिश्चित नाहीत. दुसरे म्हणजे, सामाजिक–राजकीय दृष्टिकोनामुळे, बळावर व सत्तेवर आधारलेल्या सामाजिक व राजकीय श्रेणिव्यवस्थेमुळे त्यांच्यांतून मूल्यमापनात्मक संकल्पनाही उगम पावतात. विशिष्ट बोलींना ‘ प्रमाण ’ भाषेचा उच्च दर्जा मिळतो, तर इतर बोली ‘ अ–प्रमाण ’, ‘ कनिष्ठ ’ दर्जाच्या ठरतात. ‘ भाषा म्हणजे सैनिकी पाठबळ असणारी बोलीच होय, ’ या आधुनिक भाषावैज्ञानिकांच्या दृष्टिकोनाला भरपूर आधार आहे.[१] भाषिक प्रयोग व भाषिक क्षमता यांच्यामध्ये चॉम्स्की यांनी केलेल्या भेदामुळे या प्रकारच्य

सामाजिक–राजकीय चौकटीला पार करून भाषेच्या अंतर्गत नियमव्यवस्थेचा शोध नेटाने घेणे आधुनिक भाषाविज्ञानाला शक्य झाले आहे.

## २. अमेरिकन संरचनावाद

[ अ ] भाषा म्हणजे काय ?

आधुनिक भाषाविज्ञानामध्ये फेर्दिनां द सोस्यूर, लेनर्ड ब्लूमफील्ड व नोम चॉम्स्की यांनी मांडलेले सिद्धांत हे तीन अत्यंत महत्त्वाचे टप्पे मानले जातात. वर म्हटल्याप्रमाणे सोस्यूर यांनी आधुनिक भाषाविज्ञानाचा पाया घातला. भाषाभ्यासामध्ये ' व्यवस्था ' व ' संरचना ' या अमूर्त संकल्पनांना मध्यवर्ती स्थान दिले; कालक्रमिक वा ऐतिहासिक दृष्टिकोनापेक्षा एककालिक व संरचनात्मक विश्लेषणाला अधिक महत्त्व दिले; आणि भाषा ही एक चिन्ह-व्यवस्था आहे, असे तत्त्व मांडून आधुनिक चिन्हविचाराचाही पाया घातला. सोस्यूरच्या विचारांच्या प्रभावाखाली विकसित झालेल्या भाषाविज्ञानात युरोपीय परंपरा ही काहीशी वेगळी आहे. आपल्याला येथे मुख्यतः अमेरिकन परंपरेचा विचार करायचा आहे.

सोस्यूरनंतर आधुनिक भाषाविज्ञानामध्ये ज्या अभ्यासपद्धती रूढ झाल्या, त्यांतल्या काही महत्त्वाच्या पद्धती अमेरिकन अभ्यासकांनी विकसित केल्या. उत्तर अमेरिकेमध्ये ज्या काही रेड इंडियन भाषा उरल्या होत्या, त्यांचा अभ्यास करण्यासाठी प्रामुख्याने या पद्धती निर्माण झाल्या, असे म्हणता येईल. १९११ साली प्रकाशित झालेल्या Handbook of American Indian Languages या ग्रंथाची प्रस्तावना लिहिणारा अभ्यासक फ्रान्झ बोस ( १८५८–१९४२ ) याचे या संदर्भातील योगदान फार मोठे आहे.

या ग्रंथामध्ये ( Boas १९११ ) बोस यांनी वापरलेल्या तत्त्वांपैकी एक महत्त्वाचे तत्त्व म्हणजे प्रत्येक भाषा ही अनन्य असते, हे आहे. खरे पाहता, बोस यांना असे अभिप्रेत होते, की आपल्याला माहिती असणाऱ्या भाषांपेक्षा अगदी वेगळ्या प्रकारच्या भाषा असू शकतात व त्यांच्यावर आपण उपलब्ध असणारी व्याकरणे लादू नयेत. उदाहरणार्थ, एक-वचन व बहुवचन हा व्याकरणिक भेद प्रत्येक भाषेमध्ये आढळेलच, असे नाही; क्वाकिउती या भाषेत क्रियापदाचे रूप वचनाने नियंत्रित नाही. ( संस्कृत भाषेत एकवचन, द्विवचन व बहुवचन असा त्रिविध भेद आहे. ) वर्तमानकाळ व भूतकाळ हा भेदही सार्वत्रिक मानता येणार नाही; एस्किमोसारख्या भाषेत तो आढळत नाही. तेव्हा आपल्याला परिचित असणाऱ्या भाषांची व्याकरणे अपरिचित भाषांवर लादू नयेत, येथपर्यंत बोस यांचे म्हणणे योग्यच म्हणायला हवे. परंतु स्वतः बोस व त्यांच्यानंतर येणारे अमेरिकन भाषावैज्ञानिक यांनी यातून एक मूलभूत स्वरूपाचा निष्कर्ष काढला, तो मात्र अनाठायी होता, असे म्हटले

पाहिजे. हा निष्कर्ष पुढीलप्रमाणे मांडता येईल : प्रत्येक भाषेचे व्याकरण अनन्य स्वरूपाचे असते आणि भाषाविज्ञानाचे मुख्य कार्य, म्हणजे प्रत्येक भाषेला, म्हणजे तिच्या संरचनेला अनुरूप अशी व्याकरणिक कोटिव्यवस्था शोधून काढणे.

लेनर्ड ब्लूमफील्ड ( १८८७–१९४९ ) यांच्यासारख्या अमेरिकन अभ्यासकांनी फ्रान्झ बोस यांची परंपरा पुढे चालविली. भाषेसंबंधीच्या व भाषाभ्यासाविषयीच्या पारंपरिक संकल्पनांना नाकारून भाषेचा अभ्यास जास्तीत जास्त 'वर्णनात्मक' व 'वैज्ञानिक' स्वरूपाचा करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. या अभ्यासपरंपरेला 'अमेरिकन संरचनावाद' असे नाव आहे. भाषेच्या अभ्यासाच्या पारंपरिक पद्धतींमध्ये भाषेच्या सर्वसामान्य ( universal ) वैशिष्ट्यांवर भर दिलेला असतो; परंतु अशी सर्व भाषांना समान असणारी कोणतीही वैशिष्ट्ये खरे पाहता सापडत नाहीत, असे ब्लूमफील्ड यांचे मत होते.

भाषेच्या पारंपरिक अभ्यासात, भाषा एका पिढीपासून दुसऱ्या पिढीपर्यंत संक्रमित कशी होते, याविषयी फारशी स्पष्ट भूमिका घेतलेली नव्हती. अमेरिकन संरचनावादी अभ्यासकांनी या संदर्भात एक सुस्पष्ट भूमिका मांडली. ती अशी : मानवी भाषा एका पिढीपासून दुसऱ्या पिढीपर्यंत संक्रमित होते, ती आनुवंशिकतेमुळे नव्हे, तर सामाजिक-सांस्कृतिक माध्यमांद्वारा होते; एखादा माणूस कोणती भाषा शिकणार, हे तो कोणत्या जाती-जमातीमध्ये जन्मला, यावर अवलंबून नसते, तर तो कोणत्या समाजात वाढला, शिकला, यावर अवलंबून असते; मानवेतर प्राण्याच्या बाबतीत मात्र असे दिसते, की त्यांची संदेशवहनपद्धती ही एक जैविक सहजप्रेरणा ( biological instinct ) असते व ती आनुवंशिक रीतीने संक्रमित असते; आजूबाजूची परिस्थिती कोणतीही असो, विशिष्ट जातीचा प्राणी विशिष्ट प्रकारचे संदेशच पाठवू शकतो. तेव्हा मानवेतर प्राण्यांच्या बाबतीत संदेशवहनपद्धतीचे संक्रमण हे जैविक ( genetic ) तर मानवी भाषेच्या बाबतीत ते सांस्कृतिक ( cultural ) असते, अशी अमेरिकन संरचनावादी अभ्यासकांची धारणा आहे.

भाषेचे स्वरूप आणि भाषाविज्ञानाची पद्धती या दोहोंच्या बाबतींत काही विशिष्ट संकल्पना ब्लूमफील्ड व त्यांच्या अनुयायांनी निश्चित केल्या व त्यानुसार भाषावैज्ञानिक संशोधनाला एक विशिष्ट वळण दिले. ब्लूमफील्ड यांनी भाषेविषयीची जी संकल्पना मांडली, ती त्या कालखंडात—म्हणजे साधारण १९३० च्या सुमारास—अत्यंत प्रभावशाली असणाऱ्या मनोवैज्ञानिक सिद्धांताचा आधार घेऊन मांडली. सोस्यूरप्रमाणेच ब्लूमफील्ड यांनीही व्यक्ती-व्यक्तीच्या भाषिक प्रयोगभेदांपासून अमूर्त अशी भाषिक संरचना वेगळी काढण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी त्यांनी 'वाचिक कृती' (act of speech) अशी एक संकल्पना मांडली. ही संकल्पना स्पष्ट करण्यासाठी आपण ब्लूमफील्ड यांनी वापरलेले उदाहरण तपासू.




अनुक्रमणिका

जॅक आणि जिल एकत्र चालत जात आहेत, अशी कल्पना करा. त्या वेळी, समजा, जिलला भूक लागली, आणि तिला एका झाडावर एक सफरचंद दिसले. आपल्या वागिंद्रियांच्या, म्हणजे स्वरयंत्र, जीभ व ओठ यांच्या साहाय्याने तिने काही विशिष्ट ध्वनी काढले. जॅकने लगेच कुंपणावरून उडी मारली, आणि झाडावर चढून फळ काढून ते त्याने जिलच्या हाती दिले. जिलने ते खाल्ले.

या उदाहरणातील जिलने काढलेले ध्वनी म्हणजे अर्थातच 'वाचिक कृती' होय. जिल जर एकटीच असती, तर मधल्या वाचिक कृतीशिवायच तिने इतर कृती केल्या असत्या ( Bloomfield, 1933:22 ). आता या सर्व घटनांची संगती लावण्यासाठी ब्लूमफील्ड यांनी 'वर्तन' ही संकल्पना वापरलेली आहेच आणि या संकल्पनेचे स्पष्टीकरण आणखी दोन संकल्पनांच्या साहाय्याने केलेले आहे. या दोन संकल्पना म्हणजे 'चेतक' आणि 'प्रतिक्रिया' होत. वर उल्लेखिलेल्या उदाहरणात एक वर्तन–शृंखलाच आपल्याला दिसते :

मूळ चेतक : जिलला लागलेली भूक → प्रतिक्रिया : जिलचे उच्चारण

हा झाला पहिला टप्पा. पुढच्या टप्प्यात जिलचे उच्चारण हाच चेतक बनतो :

दुय्यम चेतक : जिलचे उच्चारण → अंतिम प्रतिक्रिया : जॅकची कृती.

तेव्हा जिलचे उच्चारण हा संपूर्ण वर्तन–शृंखलेमधील एक टप्पा ठरतो. या टप्प्याला 'वाचिक वर्तन' ( verbal behaviour ) म्हणता येईल. मूळ चेतक ( जिलची भूक ) आणि अंतिम प्रतिक्रिया ( जॅकने फळ आणून देणे ) यांच्यांत एक नित्य संबंध प्रस्थापित झालेला असतो; या पैलूला ब्लूमफील्ड यांनी उच्चारणाचे आशयात्मक अंग (content) म्हटले आहे. मधली प्रतिक्रिया ( जिलचे उच्चारण ) हीच पुढच्या टप्प्यात दुय्यम चेतक बनून येते. हे उच्चारणाचे प्रत्यक्ष शारीर रूप झाले. याला आविष्करणाचे अंग ( expression ) असे नाव दिलेले आहे. भाषाविज्ञानाला या दोन अंगांमधील संबंधांचे स्पष्टीकरण वास्तविक देता यायला हवे. परंतु ब्लूमफील्ड यांचे मत असे होते, की त्यासाठी या विश्वातील भाषाबाह्य वास्तवाचे, म्हणजेच सर्व वस्तूंचे व स्थितींचे पूर्णपणे वस्तुनिष्ठ, वैज्ञानिक स्वरूपाचे वर्णन अगोदर उपलब्ध व्हायला हवे; तसे झाले, तरच भाषेत अभिव्यक्त होणाऱ्या आशयाचा, म्हणजेच 'अर्थ' ( meaning ) या भाषिक पैलूचा, विचार भाषाविज्ञानामध्ये होऊ शकेल. ( Bloomfield 1933 : 140 )

या संपूर्ण विवेचनामध्ये वर्तनवाद ( behaviourism ) या मनोविज्ञानातील भूमिकेचा

आधार घेतलेला आहे. 'मन', 'विचार', 'भावना', वगैरे संकल्पना निरीक्षणयोग्य नसल्याने त्याज्य ठरवून किंवा त्यांना निरीक्षणयोग्य बनवून वर्तनवादाने मनोविज्ञानाला एक वेगळी दिशा देण्याचा प्रयत्न केला. मनोविज्ञान म्हणजे वर्तनविज्ञान होय, अशी भूमिका मनोवैज्ञानिकांनी घेतली. शारीर वर्तन हा या भूमिकेचा केंद्रबिंदू ठरला. मानवी मन म्हणजे जणू एक कोरी पाटी असून, तिच्यावर बाह्य जगातातील वस्तू, स्थिती, घटना इत्यादी आपापले ठसे उमटवीत असतात, अशा स्वरूपाचे गृहीतकृत्य या भूमिकेच्या मुळाशी होते. 'चेतक' आणि 'प्रतिसाद' यांच्या साहाय्याने कोणत्याही वर्तनाचे स्पष्टीकरण देता येईल, असा विश्वास या मनोवैज्ञानिकांना वाटत होता. ज्ञान म्हणजे दुसरे तिसरे काही नसून विशिष्ट चेतक व विशिष्ट प्रतिसाद यांच्यामध्ये निर्माण होणारा नित्य संबंध होय, असे त्यांचे प्रतिपादन होते.

मानवी भाषेच्या संदर्भामध्ये वर्तनवादी भूमिका मांडण्याचे काम प्रथम ब्लूमफील्ड यांनी केले, असे म्हणता येईल. मानवी भाषेत व इतर प्राण्यांच्या संदेशवहनपद्धतींमध्ये फरक जरूर असतो; परंतु तो गुणात्मक नसून बव्हंशी संख्यात्मक असतो. कुत्र्यांसारख्या प्राण्यांपाशी दोन वा तीन प्रकारचेच वेगळे आवाज असतात– उदाहरणार्थ, भुंकणे, गुरगुरणे व कण्हणे– असे म्हणता येईल. पोपटासारख्या पक्ष्यांजवळ आवाज अनेक प्रकारचे असले, तरी त्या सर्व आवाजांना वेगवेगळ्या प्रकारे ते प्रतिसाद देत असतात, असे काही म्हणता येणार नाही. उलट, माणसाकडे आवाज आणि त्यांना देण्यात येणारे प्रतिसाद / प्रतिक्रिया यांची संख्या खूपच मोठी असते. एखाद्या विशिष्ट चेतकाच्या प्रभावामुळे माणूस स्वरयंत्रातून वेगवेगळे आवाज काढीत असतो व त्याच्या आजूबाजूची माणसे ते आवाज ऐकून योग्य त्या प्रतिक्रिया देत असतात.[२]

[ आ ] भाषाविज्ञान म्हणजे काय ?

ब्लूमफील्डने वर्तनवादी भूमिकेतून मांडलेली भाषेची संकल्पना कशी होती, ते आपण तपासत होतो. आता ब्लूमफील्डवादी भाषावैज्ञानिकांनी भाषेच्या संरचनेच्या विश्लेषणाची जी पद्धती विकसित केली तिचा थोडक्यात विचार करू. ही पद्धती वस्तुनिष्ठ व वैज्ञानिक स्वरूपाची आहे, असा दावा ब्लूमफील्डवादी अभ्यासकांनी केलेला होता.

भाषाभ्यासाच्या पारंपरिक पद्धतीवर ब्लूमफील्डवादी अभ्यासकांचा प्रमुख आक्षेप असा होता, की ही अभ्यासपद्धती 'अ-वैज्ञानिक' स्वरूपाची आहे. 'अ-वैज्ञानिक' या अर्थाने की प्राकृतिक विज्ञानांच्या ( Natural Sciences ) पद्धतीचा अवलंब तिच्यामध्ये केला जात नाही. प्राकृतिक विज्ञानांच्या पद्धती म्हणजे पूर्णतः 'अनुभवनिष्ठ' (empirical ) पद्धती. ऐंद्रिय निरीक्षण हा या पद्धतींचा गाभा होय. फ्रान्सिस बेकन ( १५६१–१६२६ )

या इंग्लिश तत्त्ववेत्त्याने ' विगामी ' ( inductive ) तार्किक पद्धतीचे जे स्वरूप विज्ञानाची शोधपद्धती म्हणून निश्चित केलेले होते, त्याचा उपयोग भाषाविज्ञानात करून अमेरिकन संरचनावाद्यांनी आपल्या विश्लेषणपद्धती विकसित केल्या. कोणत्याही घटिताचा वैज्ञानिक अभ्यास करायचा असेल, तर प्रथम घटितांचे ऐंद्रिय निरीक्षण ( observation ) करायचे, त्यासाठी प्रयोग ( experiments ) करायचे, आणि या विशिष्ट घटितांच्या निरीक्षणाच्या, म्हणजेच पुराव्याच्या आधारे सर्वसामान्य निष्कर्ष ( generalization ) काढायचा; अधिक निरीक्षण करून हा निष्कर्ष पडताळून पाहायचा.

भाषेचा वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास करायचा, म्हणजे तिचे प्रत्यक्ष निरीक्षण करायचे. याचाच अर्थ असा, की निरीक्षणासाठी ज्या गोष्टी उपलब्ध नाहीत, त्यांची दखल घेण्याची आवश्यकता नाही. वर आपण मानसशास्त्रातील वर्तनवादी भूमिकेची काही तत्त्वे तपासलेली आहेत. या भूमिकेचाही अमेरिकन संरचनावादावर मोठाच पगडा होता, ही गोष्ट स्पष्टच आहे. वर्तनवादी आणि अनुभववादी तत्त्वांच्या साहाय्याने या भाषावैज्ञानिकांनी विशिष्ट प्रकारच्या विश्लेषणात्मक पद्धती विकसित केल्या.

भाषावैज्ञानिक विश्लेषणासाठी दोन गोष्टींची आवश्यकता असते, अशी या अभ्यासकांची धारणा होती. एक म्हणजे, प्रत्यक्ष वापरली गेलेली व नोंदवलेली उच्चारणे. ही झाली निरीक्षणयोग्य अशी अभ्यासविषयाची सामग्री( corpus ). दुसरे म्हणजे, या सामग्रीच्या विश्लेषणासाठी आवश्यक असणाऱ्या शोधन-पद्धती ( disocovery procedures ).

भाषावैज्ञानिक शोधन-पद्धतीचे स्वरूप या संशोधकांनी पुढीलप्रमाणे निश्चित केले. प्रथम भाषिक विश्लेषणाच्या पातळ्या ठरवायच्या. भाषेचे मूल स्वरूप म्हणजे वाचिक वर्तन होय व हे वर्तन मूलतः ध्वनिरूप असते. तेव्हा भाषेची सहजपणे इंद्रियगोचर असणारी पातळी म्हणजे ध्वनींची पातळी होय. भाषिक ध्वनींच्या किंवा स्वनांच्या पातळीपासून सुरुवात करून, शब्दरूपे वा पदे, आणि वाक्ये या अधिक गुंतागुंतीच्या संरचनात्मक पातळ्यांपर्यंत प्रवास करायचा. तेव्हा स्वन → रूपे वा पदे → वाक्ये, या तीन पातळ्या निश्चित झाल्या, व विश्लेषणाचा क्रमही निश्चित झाला. ' अर्थ ' या भाषेच्या पैलूचे प्रत्यक्ष ऐंद्रिय निरीक्षण होऊ शकत नाही, त्यामुळे त्याचा अभ्यास मागे पडला. विश्वातील भाषाबाह्य वास्तवाचे पूर्णपणे वस्तुनिष्ठ व वैज्ञानिक स्वरूपाचे वर्णन उपलब्ध झाल्यानंतरच ' अर्थ ' या पातळीचा विचार करता येईल. या आशयाच्या ब्लूमफील्ड यांच्या भूमिकेची दखल आपण आधी घेतलेलीच आहे.

यापुढची पायरी म्हणजे स्वन, रूपे व वाक्ये या पातळ्यांवर प्रथम लघुतम घटक वा

मूलघटक ( segments or minimal units ) निश्चित करायचे. हे करीत असताना 'व्यवच्छेदकत्व ' ( contrast ) हे तत्त्व प्रामुख्याने वापरायचे. स्वनांच्या पातळीवरील मूलघटकांना 'स्वनिम ' ( phoneme ), तर रूपांच्या पातळीवरील मूलघटकांना ' रूपिम' वा ' पदिम '( morpheme ) अशा संज्ञा वापरल्या जातात. उदाहरणार्थ, मराठीमध्ये ' पळ ' आणि ' बळ ' असे वेगळे शब्द असल्याने /प/ आणि /ब/ हे स्वन ' व्यवच्छेदक ' वा ' भिन्न ' आहेत असे म्हणता येते; म्हणजेच हे दोन ध्वनी मराठीमध्ये ' स्वनिम ' ठरतात.

प्रत्येक पातळीवर ' प्रतियोजन ' ( substitution ) करून, म्हणजे एकाच स्थानी मूलघटकांची अदलाबदल करून, हे लघुतम घटक कोणत्या संरचनात्मक परिसरात अवतरणे शक्य आहे ते शोधून काढायचे आणि त्या आधारे या घटकांचा विनियोग (distribution) निश्चित करायचा. या विनियोगाच्या आधारे लघुतम घटकांचे वर्गीकरण करायचे व एक जंत्री तयार करायची; उदाहरणार्थ, स्वर, अर्धस्वर आणि व्यंजने हे स्वनिमांचे एक महत्त्वाचे वर्गीकरण होय. विनियोगाचे उदाहरण घ्यायचे, तर / ङ / हा मराठीतील व्यंजन-स्वनिम या भाषेत शब्दाच्या मध्यस्थानी वा अंत्यस्थानी येऊ शकतो; परंतु आद्यस्थानी येऊ शकत नाही; ही माहिती / ङ / या स्वनिमाच्या विनियोगाचा भाग होय.

अमेरिकन संरचनावादी भाषावैज्ञानिकांनी मांडलेले महत्त्वाचे तत्त्व असे होते, की प्रत्येक भाषेची संरचना वेगळी असते. फ्रान्स बोस यांच्या मताची चर्चा वर आपण केलेलीच आहे. ब्लूमफील्ड यांच्या अनुयायांनी याच तत्त्वाचा पुरस्कार केला. उदाहरणार्थ, मार्टिन जूस या संशोधकाने अशी भूमिका घेतलेली आहे, की भाषेच्या संरचनेच्या बाबतीत कोणत्याही प्रकारची मूलभूत बंधने वा सीमा असलेल्या दिसत नाहीत; भाषाभाषांमध्ये जे भेद असतात ते कोणत्याही निश्चित तत्त्वांनी सीमित झालेले नसतात ( Joos, 1957. )[३]

तेव्हा प्रत्येक भाषेतील मूलघटक वेगवेगळे असतात. हे तत्त्व प्रत्येक पातळीवर लागू करायला हवे. ' प ' आणि ' ब ' हे मराठी भाषेमध्ये व्यवच्छेदक असल्याने स्वनिम म्हणून वावरतात, हे आपण वर पाहिले; परंतु प्रत्येक भाषेत ते स्वनिम म्हणून वावरतीलच असे नव्हे. उदाहरणार्थ, अरेबिक भाषेमध्ये या ध्वनींमध्ये व्यवच्छेदक स्वरूपाची भिन्नता असलेली आढळत नाही. विनियोगाच्या बाबतीतही प्रत्येक भाषेची संरचना वेगवेगळी असते; उदाहरणार्थ, मराठीप्रमाणेच कॅन्टोनीझ या भाषेतही ' ङ ' हा ध्वनी स्वनिमच असतो. परंतु कॅन्टोनीझमधील त्याचा विनियोग मराठीतील विनियोगापेक्षा वेगळा असतो, कारण या भाषेत हा स्वनिम ' ङो ' ( = मी ) यासारख्या शब्दांमध्ये आद्यस्थानीही येऊ शकतो. मराठीत मात्र तो तसा येऊ शकत नाही.

मात्र प्रत्येक भाषेची संरचना वेगळी असली, तरी या संरचनेचा शोध घेणाऱ्या वैज्ञानिक पद्धती त्याच असतात, असे तत्त्व अमेरिकन संरचनावाद्यांनी मांडले होते. ऐंद्रिय निरीक्षण करून सामग्री गोळा करणे, या सामग्रीचे विविध पातळ्यांवर विश्लेषण करणे, प्रत्येक पातळीवरील मूलघटक शोधून त्यांचे विनियोग निश्चित करणे, व त्या आधारे एक वर्गीकरणात्मक जंत्री ( taxonomy ) तयार करणे– असे या पद्धतीचे स्वरूप होते.

अशा प्रकारची पूर्णपणे विगामी स्वरूपाची, ऐंद्रिय निरीक्षणावर आधारलेली, वस्तुनिष्ठ अशी शोधन–पद्धती वापरली, की कोणत्याही भाषेची संरचना आपोआपच हाती लागते, असा विश्वास अमेरिकन संरचनावादी भाषावैज्ञानिकांना वाटत होता. या अभ्यासकांनी विकसित केलेला समग्र वर्णनात्मक अनुबंध ( descriptive model ) पुढीलप्रमाणे दाखविता येईल :( पान १६ पाहा. )

भाषाविज्ञानाविषयीच्या अमेरिकन संरचनावादी संशोधकांच्या भूमिकेचा सारांश थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल :

अ ) प्रत्येक भाषेची संरचना अनन्य असते, त्यामुळे तिचे व्याकरणही अनन्य असते. कारण व्याकरण म्हणजे भाषेच्या रचनेचे वर्णन.

आ ) मानवी भाषा ही समाज–सापेक्ष, संस्कृति–सापेक्ष असते; तिचे संक्रमण जैविक नसून सामाजिक–सांस्कृतिक असते; समाज–संस्कृतीच्या प्रभावाखाली विकसित होणारी ती एक व्यवस्था असते.

इ) भाषेचा ‘ वैज्ञानिक ’ अभ्यास केवळ ऐंद्रिय निरीक्षणाच्या आधारेच होऊ शकतो; निरीक्षणयोग्य अशा वाचिक वर्तनाच्या स्वरूपात भाषेचा शोध घेतला, तरच तो वैज्ञानिक शोध ठरेल.

ई) या निरीक्षणाधिष्ठित शोधासाठी ज्या वस्तुनिष्ठ अशा शोध–पद्धती निश्चित कराव्या लागतात, त्या करणारे विज्ञान म्हणजे भाषाविज्ञान होय; या पद्धतींच्या साहाय्याने कोणत्याही भाषेच्या संरचनेचे अचूक वर्णन आपोआप हाती लागते.

## ३. चॉम्स्की यांनी केलेले खंडन

अमेरिकन संरचनावादी भाषावैज्ञानिकांच्या या अनुभववादी ( empiricist ) शोध–पद्धतींच्या मर्यादा नेमकेपणे दाखवून देण्याचे महत्त्वाचे कार्य चॉम्स्की यांनी केले. चॉम्स्की यांच्या सिद्धांतनाचा लक्षणीय भाग या खंडनाने व्यापलेला आहे. तेव्हा भाषा आणि भाषाविज्ञान या दोन्ही संकल्पनांच्या बाबतीत त्यांनी अमेरिकन संरचनावादी सिद्धांताविरुद्ध केलेला युक्तिवाद पाहणे उद्बोधक ठरेल.

आकृती : १


वाक्य–वर्गीकरण
शब्द
प्रतियोजन
शब्द–वर्गीकरण
वाक्य–विचार
( Syntactic
Component )
रूपाधिष्ठित चिन्हांकन
( Morphemic Transcription )
रूपिमे
प्रतियोजन
रूप–वर्गीकरण
व्यवच्छेदकत्व
रूपे
रूपिमविचार
( Morpholgical
Component )
स्वनिमाधिष्ठित चिन्हांकन
( Phonemic Transcription )
स्वनिम
प्रतियोजन
स्वनिम–वर्गीकरण
व्यवच्छेदकत्व
स्वन
स्वनिमविचार
( Phonological
Component
प्राथमिक सामग्री

प्रत्येक भाषेची रचना पूर्णतया अनन्य असते, हा संरचनावाद्यांचा दावा चॉम्स्की यांनी फेटाळून लावलेला आहे. त्याचप्रमाणे भाषा ही मूलतः समाज–संस्कृति–सापेक्ष स्वरूपाची असते, हेही त्यांना मान्य नाही. भाषेचा सामाजिक–राजकीय विचार बाजूला काढून एका अधिक अमूर्त पातळीवर भाषेच्या संरचनेचा विचार चॉम्स्की करू पाहतात, हे आपण पाहिलेले आहे. या पातळीवर भाषाभाषांमधील भेदापेक्षा साम्यस्थळे, किंबहुना ' भाषिक सामान्ये '( language universals ) अधिक महत्त्वाची ठरतात, भाषाभाषांमधील भेद कोणत्याही तत्त्वानुसार सीमित झालेले नसतात. ही मार्टिन जूस यांनी मांडलेली भूमिका वरवरची आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. स्वनिम, वाक्ये व अर्थ या तीनही पातळ्यांवर भाषिक सामान्ये आढळतात, त्याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाषाभाषांमधील भेद काही मूलभूत तत्त्वांनी सीमित झालेलेही आढळतात, व ही तत्त्वे संरचनात्मक वा आकारिक ( formal ) स्वरूपाची असतात. भाषाभाषांमध्ये ही जी आकारिक सामान्ये आढळतात, त्यांचे स्पष्टीकरण ऐतिहासिक वा भौगोलिक पुराव्यांच्या साहाय्याने देता येत नाही. वाक्यरचनांचे काही प्रकार (उदाहरणार्थ, प्रश्नार्थक रचना, संबंधी रचना ( relative clause ), इत्यादी अनेक भाषांमधे सारखाच आकार घेताना आढळतात; किंबहुना या रचनांचे काही मूलभूत साचे असलेले आढळतात व त्या साच्यांपैकी काही साच्यांचा वापर विशिष्ट भाषा करीत असतात. बालभाषेचे टप्पेही खूपसे सारख्याच स्वरूपाचे असलेले दिसतात.

उदाहरणादाखल एक रचना घेऊ. विधानार्थी वाक्य व प्रश्नार्थी वाक्ये या रचना सर्व मानवी भाषांमध्ये आढळतात; त्यांच्यांत भेद असतो तसेच एक रचनात्मक नातेही असते. मराठीमध्ये ' हो / नाही ' उत्तर अभिप्रेत असणारी प्रश्नार्थी वाक्ये ( Yes/No Interrogatives ) वाक्यांशी पुढील प्रकारे संबंधित असलेली आढळतात :

( १ ) **विधानार्थी** त्याने पुस्तक विकत घेतलं.
( घेतलं या शब्दावर उतरती सुरावट किंवा falling intonation )

( २ ) **प्रश्नार्थी** : [ अ ] त्याने पुस्तक विकत घेतलं ?
( घेतलं या शब्दावर चढती सुरावट किंवा rising intonation )
[ आ ] त्याने पुस्तक विकत घेतलं, ना ? / नं ? / नाही का ?
( विधानार्थी वाक्य तसेच ठेवून त्याच्यापुढे प्रश्नपूर्वक वाक्यांश जोडून )
[ इ ] त्याने पुस्तक विकत घेतलं का ? / काय ?
( का, काय या खास प्रश्नवाचक रूपांचा उपयोग )

मराठीमध्ये शब्दांच्या क्रमामध्ये बदल करून प्रश्नार्थी वाक्ये बनत नाहीत, परंतु इंग्लिशसारख्या भाषेत तो प्रकार महत्त्वाचा असतो व त्याचबरोबर वर उल्लेखिलेले प्रकारही आढळतात :

( 3 ) Declarative : He bought a book.
( Falling intonation on book )

( 4 ) Interrogative : [ a ] He bought a book ?
( Rising intonation on book )
[ b ] He bought a book, didn't he ? / right ?
( by adding a tag question )
[ c ] Did he buy a book ?
( by performing a syntactic operation such as inverting subject and verb, and adding the appropriate form of do at the beginning)

आजवर भाषावैज्ञानिकांनी अनेक भाषांच्या रचनांचा अभ्यास करून त्यांची व्याकरणे लिहिलेली आहेत, परंतु वर उल्लेखलेल्या तीन-चार प्रकारांपेक्षा वेगळी अशी प्रश्नार्थक रचना कोठेही आढळलेली नाही. यावरून एक अनुमान असे करता येईल, की भाषाभाषां-मधील रचनांमध्ये भेद असले, तरी त्या भेदांवर काही निश्चित अशी बंधने असली पाहिजेत; या बंधनांनी आखून दिलेल्या वा सीमित केलेल्या चौकटीमध्येच मानवी भाषा वावरू शकतात.

लहान मूल भाषा आत्मसात करीत असताना ते वेगवेगळ्या टप्प्यांमधून जात असते. मनोवैज्ञानिकांनी यासंबंधी केलेल्या संशोधनावरून असे दिसते, की बालभाषेच्या विकासाचे टप्पेही खूपसे ठरवून दिल्यासारखे, एकाच साच्याचे असतात. मराठीच्या संदर्भात नकारार्थी रचना आत्मसात होताना पुढील प्रक्रिया घडताना आढळतात. दोन शब्दांच्या टप्प्यामधून जात असताना ' नतो ' किंवा ' नको ' असा शब्द एखाद्या शब्दाच्या पुढे टाकून नकारार्थी रचना साधली जाते.

( ५ ) ( अ ) दुदू नतो.
( आ ) जा नतो.

आता या तऱ्हेची वाक्ये लहान मुले आपणच निर्माण करीत असतात, ही गोष्ट उघड आहे. प्रौढांनी अशी वाक्ये प्रथम उच्चारली व ती ऐकून मुले शिकली, असा काही प्रकार येथे नसतो; प्रौढ-भाषेच्या व्याकरणानुसार ही वाक्ये कुरचितच आहेत. बालभाषेचे

प्रारंभीचे हे टप्पे ओलांडून नकारार्थी वाक्यांमधील वेगवेगळी धातुरूपे आत्मसात करून मूल प्रौढ–भाषेच्या जवळ सरकत असते. आता प्रश्न असा, की नेमक्या याच प्रकारच्या टप्प्यांमधून बालभाषा का जात असते? याही प्रश्नाचे उत्तर भाषिक सामान्यांच्या संकल्पनेच्या साहाय्याने देता येते. विनासायास पद्धतीने अत्यंत झपाट्याने घडणारी बालभाषेतील ठरावीक स्वरूपाची स्थित्यंतरे म्हणजे निसर्गदत्त वा अंगभूत अशा तत्त्वांच्या साहाय्याने संपादिलेल्या ज्ञानाचीच उदाहरणे असतात, असे प्रतिपादन चॉम्स्की यांनी केलेले आहे.

बालभाषेचे सार्वत्रिक आढळणारे टप्पे असोत वा सार्वत्रिक आढळणाऱ्या भाषिक रचना असोत, दोहोंमधून भाषिक सामान्यांची एक चौकट आढळते. या चौकटीचा शोध घेणे हे चॉम्स्की यांच्या मते भाषाविज्ञानाचे फार महत्त्वाचे उद्दिष्ट होय. या संदर्भात भाषा, मन आणि मानवाची जैविक घडण यांविषयी चॉम्स्की यांनी मांडलेल्या विचारांचा उल्लेख आपण थोडा नंतर करू.

अमेरिकन संरचनावादी भाषावैज्ञानिकांनी 'विज्ञान' या संकल्पनेविषयी जी भूमिका घेतली होती व विशेषतः या संकल्पनेवर आधारून ज्या शोध–पद्धती त्यांनी भाषाविज्ञानामध्ये विकसित केल्या होत्या, त्यांची चॉम्स्की यांनी केलेली चिकित्सा मननीय आहे. चॉम्स्की यांचा पहिला आक्षेप म्हणजे या शोध–पद्धती गोळा केलेल्या सामग्रीपुरत्याच मर्यादित (corpus–bound) आहेत. दुसरे म्हणजे, या शोध–पद्धती केवळ वर्गीकरणात्मक किंवा जंत्रीवजा (taxonomic) वर्णन देणाऱ्या आहेत. परंतु भाषा म्हणजे केवळ गोळा केलेले उद्‌गार नव्हेत, तर भाषेत शक्य असणारे सर्व उद्‌गार. तेव्हा या सर्व शक्यतांचा वेध घेण्याची, त्यांच्याविषयी भाकिते करण्याची ताकद सिद्धांतामध्ये असल्याखेरीज तो सिद्धांत पर्याप्त ठरणार नाही. याचाच अर्थ असा, की भाषेच्या निर्मितिशीलतेचा, तिच्या अपरिमिततेचा वेध भाषाविज्ञानाने घ्यायला हवा.

भाषेचा अभ्यास वस्तुनिष्ठ अशा वैज्ञानिक पद्धतीने व्हायला हवा, हे खरे; परंतु 'विज्ञान' या संकल्पनेचा अमेरिकन संरचनावाद्यांनी लावलेला अर्थ चुकीचा आहे, असे चॉम्स्की यांचे म्हणणे आहे. भाषा म्हणजे चॉम्स्की यांच्या मते वाचिक वर्तन नसून भाषिक ज्ञान वा क्षमता होय, हे आपण पाहिले आहे. भाषिक ज्ञान म्हणजे अर्थातच अमूर्त अशा भाषिक व्यवस्थेचे ज्ञान. अमूर्त अशा भाषिक व्यवस्थेचे व क्षमतेचे ऐंद्रिय निरीक्षण करता येणे अशक्यच आहे. परंतु त्यामुळे भाषेचा अभ्यास अ–वैज्ञानिक ठरतो, असे मानण्याचे कारण नाही. प्राकृतिक विज्ञानांमध्येही अमूर्त अशा संकल्पना वापराव्या लागतातच, आणि त्यांना या विज्ञानांमध्ये मूलभूत स्थानही असते. पदार्थविज्ञानामध्ये वस्तुमान, गुरुत्वाकर्षण यांसारख्या मूलभूत संकल्पना ऐंद्रिय अनुभवाधिष्ठित नाहीत.

ऐंद्रिय निरीक्षणामधून पुरावा गोळा केला, की आपोआप सर्वसामान्य निष्कर्ष त्यातून

निवतात, ही समजूतही भ्रामक आहे. विज्ञानामधील शोध लागतात, नवे सिद्धांत मांडले जातात, ते यांत्रिक शोध–पद्धती वापरून नव्हे. घटितांचे निरीक्षण करण्यासाठी अभ्यासकाला घटितांसंबंधी काही प्रश्न पडावे लागतात. हे प्रश्न नेमके कसे पडतात, याचा काही नेम सांगता येत नाही. काही वेळा केवळ योगायोगाने प्रश्न उभे राहू शकतात. प्रश्न कसे पडले, याला वैज्ञानिक सिद्धांतनाच्या दृष्टीने काहीच महत्त्व नसते. एकदा प्रश्न सुचले, की त्यांची काहीशी तात्पुरत्या स्वरूपाची उत्तरे वा स्पष्टीकरणे अभ्यासकाला मांडावी लागतात. हे एक प्रकारचे पूर्व–अनुमानच असते. याला 'अभ्युपगम' (hypothesis) म्हणता येईल. हा अभ्युपगम सुव्यक्तपणे (explicitly) मांडलेला असावा लागतो, म्हणजे त्यातून घटितांविषयी निरीक्षणाने पडताळून पाहता येतील अशी विधाने करता यावी लागतात. येथे खरे पाहता निगमनाची (deductino) प्रक्रिया घडत असते, कारण सर्वसामान्य विधानाच्या वा अभ्युपगमाच्या आधारे विशिष्ट घटितांसंबंधीची विधाने येथे केली जातात. तेव्हा वैज्ञानिक पद्धत म्हणजे निव्वळ विगामी पद्धत नव्हे, तर विगमन व निगमन यांची सांगड घालणारी अभ्युपगम–निगामी पद्धत (hypthetico-deductive method) होय.[४]

घटितांचे यांत्रिकपणे स्पष्टीकरण देणाऱ्या शोध-पद्धती अजून प्राकृतिक विज्ञानांनाही तयार करता आलेल्या नाहीत. भाषाविज्ञानाने त्या विकसित केल्या आहेत, असे म्हणणे हे अतिमहत्त्वाकांक्षी विधान ठरेल. तेव्हा भाषाविज्ञानाने या शोध-पद्धतींचा नाद सोडून द्यावा आणि भाषिक घटितांसंबंधी काही अमूर्त असे तार्किक बंध (logical constructs) विकसित करावेत व त्यांतून भाषेच्या स्वरूपाचा वेध घेणारा, म्हणजेच भाषिक घटितांचे स्पष्टीकरण देणारा व त्यांच्याविषयी भाकिते करणारा सिद्धांत मांडावा, असे चॉम्स्की यांचे म्हणणे आहे. चॉम्स्की यांनी भाषेच्या संदर्भात मांडलेल्या 'भाषिक क्षमता' या अमूर्त संकल्पनेची चर्चा आपण आधी केलेलीच आहे. 'भाषा' ही संकल्पना वैज्ञानिक अभ्यासाच्या दृष्टीने पुरेशी अमूर्त नाही, कारण तिला सामाजिक–राजकीय संदर्भापासून, विशेषतः सामाजिक व राजकीय सत्ता व बळ यांच्यापासून वेगळे करणे, ही फार अवघड गोष्ट आहे. तेव्हा 'बाह्यगत भाषा' (externalized language) व 'अंतर्गत वा आत्मसातीकृत भाषा' (internalized language) असा भेद करून 'अंतर्गत भाषे'वर, म्हणजेच भाषिक ज्ञानावर वा 'व्याकरण' या संकल्पनेवर भाषावैज्ञानिकांनी लक्ष केंद्रित करायला हवे, असे चॉम्स्की मानतात. (पहा : Chomsky, 1979 : 190–1 4; 1986 : 15-24)

## ४. चॉम्स्की यांचा सिद्धांत

चॉम्स्की यांच्या भाषावैज्ञानिक सिद्धांतामधील प्रमुख तत्त्वांचा परामर्श आता आपण

घेऊ. या सिद्धांताविषयी सर्वांगीण विवेचन करणे या लेखाच्या आवाक्याबाहेरचे आहे. तेव्हा भाषा व भाषाविज्ञान यांच्याविषयी त्यांनी मांडलेल्या काही मूलभूत संकल्पनांचा मागोवा घेत आपण त्यांच्या सिद्धांतनाचे स्वरूप तपासू. या मूलभूत संकल्पना म्हणजे : भाषिक ज्ञान, व्याकरणाचे निर्देशनसामर्थ्य आणि रचनांतरण.

## ( अ ) भाषिक ज्ञान

मानवी भाषा, ज्ञान आणि मनाची जैविक घडण यांविषयी चॉम्स्की यांनी मांडलेल्या विचारांचा परामर्श येथे घ्यायला हवा. प्रत्यक्ष वाचिक वर्तनामागे, म्हणजेच भाषिक ' प्रयोगा 'मागे जे भाषिक ज्ञान असते, तिला भाषिक ' क्षमता ' असे नाव त्यांनी दिले आहे. आपल्याला आपली निजभाषा येते म्हणजे त्या भाषेतील सर्व वाक्ये आपण पाठ केलेली असतात, असे नाही. गणितातील एक उदाहरण घेऊ. ५४३×७०८=३८४४४४ हे काही आपण पाठ करीत नाही, किंवा हाच विशिष्ट गुणाकार आपल्याला कोणी शिकवायला हवा असे नाही. ० ते ९ या संख्यांसंबंधीचे नियम ( पाढे ) माहिती झाले व त्या नियमांचे पुनः पुन्हा उपयोजन करताना करण्याच्या काही क्रिया ( हातचे घेणे, इत्यादी ) आत्मसात झाल्या, की आपण गुणाकाराचे हेच विशिष्ट उदाहरण नव्हे, तर इतर कोणतेही ' नवे ' उदाहरण सोडवू शकतो. भाषेच्या बाबतीतही काहीसे असेच असते. पूर्वी कधीही न ऐकलेल्या ' नव्या ' वाक्यांचे आकलन होणे आणि स्वतः ' नव्या ' वाक्यांची निर्मिती करणे, या प्रक्रिया आपल्या भाषिक प्रयोगात सतत घडत असतात. या प्रक्रिया शक्य होतात, त्या भाषिक क्षमतेमुळे, म्हणजेच नियमव्यवस्थेच्या ज्ञानामुळे.

भाषिक घटकांचे व नियमव्यवस्थेचे ज्ञान प्राप्त करून घेण्याची एक मानसिक कुवत मानवापाशी निसर्गतःच असते; मानवाच्या निसर्गदत्त जैविक घडणीचा तो एक अंगभूत भागच असतो. मूल लहानाचे मोठे होत असताना त्याच्या कानांवर जे भाषिक प्रयोग पडतात, ते नेहमी व्याकरणशुद्ध वा परिपूर्ण स्वरूपाचे असतीलच, असे नाही; बहुधा ते अर्धवट स्वरूपाचे असतात ( अर्धवट सोडलेली वाक्ये; ' होय ', ' नाही ', ' केव्हा ', ' शाबास ', या तऱ्हेचे उद्‌गार इत्यादी ); अनेकदा व्याकरणदृष्ट्या अशुद्धही असतातच. भाषिक अनुभव म्हणून विचार करता तो अगदी तुटपुंजा, अपुरा व सदोष असतो. परंतु कोणत्याही मुलाचे त्यामुळे काहीही बिघडत नाही. मूल जर अव्यंग असेल– त्याची वागिंद्रिये वा मेंदूमधील वाचा–केंद्रे ही शाबूत असतील · तर या तुटपुंज्या व सदोष अनुभवातूनच अत्यंत व्यामिश्र, समृद्ध व पूर्णाकारी अशी नियमव्यवस्था मानवी मनात बालपणीच निर्माण होते. साधारण १८ महिने ते ४८ महिने या वयाच्या कालखंडात ही प्रक्रिया घडते, आणि आजूबाजूची सामाजिक, सांस्कृतिक वा शैक्षणिक परिस्थिती यांचा तिच्यावर काही परिणाम घडत नाही; म्हणजे असे, की मूल समाजाच्या ज्या घरात वा कुटुंबात वाढते

आहे, त्याची शैक्षणिक पातळी वगैरे गोष्टींचा भाषेचे सहजज्ञान प्राप्त होण्याशी काहीच संबंध नसतो. मुलाचा कल वा अभिवृत्ती ( aptitude) किंवा बुद्ध्यंक ( I. Q. ) याही गोष्टींचा भाषा आत्मसात होण्याशी काहीही संबंध नसतो.

मानवापाशी अनेक प्रकारची मानसिक सामर्थ्ये असतात. उदाहरणार्थ, दृक् व श्राव्य संवेदनांचा अर्थ लावणे, भाषिक अनुभवांचा अर्थ लावणे इत्यादींसाठी वेगवेगळ्या यंत्रणा मानवी मनात विकसित होत असतात. या यंत्रणा मुळात निसर्गदत्त वा जैविक स्वरूपाच्या असतात, असे मानणे जास्त सयुक्तिक आहे. भाषा आत्मसात करण्याची जी जैविक यंत्रणा मानवी मनात असते, तिला 'भाषार्जनाची यंत्रणा' ( Language Acquisition Device किंवा थोडक्यात LAD ) असे नाव चॉम्स्की यांनी दिले आहे. सर्व भाषांना समान अशी काही मूलभूत तत्त्वे असतात, व या तत्त्वांचे मिळून 'सर्वनिष्ठ व्याकरण' ( Universal Grammar ) बनते, असा एक सिद्धांत चॉम्स्की यांनी मांडलेला आहे. अर्थातच विशिष्ट भाषेचे हे व्याकरण नव्हे. भाषाभाषांमधील भेद सीमित करणारी जी तत्त्वे असतात त्यांचा समावेश या जैविकदृष्ट्या निर्धारित असणाऱ्या यंत्रणेत होतो.

### ( आ ) व्याकरणाचे निर्देशनसामर्थ्य

जैविकदृष्ट्या उपजतपणे प्राप्त झालेल्या भाषार्जनाच्या कुवतीच्या वा यंत्रणेच्या साहाय्याने विशिष्ट भाषेचे व्याकरण मानवी मनात साकार होत असते. भाषेचे व्याकरण हा भाषेविषयीचा एक सिद्धांतच होय. 'भाषेचे व्याकरण' ही संकल्पना संदिग्ध आहे, यात शंका नाही. 'भ' या विशिष्ट भाषेचे व्याकरण, असा अर्थ घेतला, तर 'भ'चे व्याकरण म्हणजे ( अ ) 'भ'च्या निजभाषकांनी आत्मसात केलेली 'भ'ची नियमव्यवस्था, आणि ( आ ) वैयाकरणांनी केलेले 'भ'च्या या ज्ञानाचे सुव्यक्त वर्णन असे त्याचे दोन अर्थ होतील. सर्वसामान्य स्वरूपाचा व्याकरणविषयक सिद्धांत ( किंवा, खरे म्हणजे 'अति-सिद्धांत' meta-theory ), असा अर्थ घेतला, तर व्याकरण म्हणजे ( अ ) मानवाला उपजतपणे प्राप्त झालेली भाषार्जनाची कुवत वा यंत्रणा, आणि ( आ ) भाषावैज्ञानिकांनी केलेले या जैविक कुवतीचे वा यंत्रणेचे सुव्यक्त वर्णन असे त्याचे अर्थ होतील. मुद्दा असा, की विशिष्ट भाषेच्या ज्ञानाच्या पातळीवर काय किंवा जैविक कुवतीच्या पातळीवर काय, व्याकरणाला वा भाषिक सिद्धांताला भाषिक संरचनांचे केवळ तार्किक वर्णन देऊन भागणार नाही. आणखी अपेक्षा अशी, की व्याकरण हे 'मानसिक दृष्ट्या वास्तव' ( psychologically real ) असायला हवे. 'भ'च्या निजभाषकांच्या ज्ञानाचे, त्याचप्रमाणे मानवाच्या भाषार्जनाच्या मानसिक कुवतीचे स्पष्टीकरण त्यातून मिळाले पाहिजे.

भाषेमध्ये कोणत्या प्रकारच्या रचना समाविष्ट होऊ शकतात, याविषयी व्याकरणिक सिद्धांत सुव्यक्त अशी विधाने करीत असतो, आणि त्याहीपुढे जाऊन त्या रचनांचे सूत्रांच्या

रूपात संरचनात्मक वर्णन करीत असतो. व्याकरणाच्या या वैशिष्ट्याला चॉम्स्की यांनी गणितीय परिभाषेतील जी संज्ञा वापरलेली आहे, ती म्हणजे ' निर्देशनसामर्थ्य ' वा ' जनन-सामर्थ्य ' ( generative capacity ) ही होय. Generate या शब्दाचा सर्वसामान्य वापरातील अर्थ म्हणजे produce वा ' निर्माण करणे '. परंतु त्याचा गणितातील व तर्कशास्त्रातील पारिभाषिक अर्थ explicitly specify किंवा ' निर्देशन वा जनन करणे ' असा आहे. (' जनन ' व 'निर्देशन ' या येथे पारिभाषिक संज्ञा म्हणून वापरलेल्या आहेत. परंतु सर्वसामान्य वापरात ' जनन ' या शब्दाला असलेला अर्थ आपल्याला येथे टाळायचा असल्याने आपण ' निर्देशन ' हीच संज्ञा पुढे वापरू.)

संख्यांच्या संबंधातील एक उदाहरण घेऊन हा अर्थ स्पष्ट करता येईल. आपण विषम संख्या ही कल्पना घेऊ. वर म्हटल्याप्रमाणे सर्व विषम संख्या काही आपण पाठ करीत नाही, म्हणजेच सुट्यासुट्या डोक्यात साठवून ठेवत नाही; तसे करताच येणार नाही, कारण सर्व विषम संख्यांचा संच हा एक अपरिमित संच ( infinite set ) आहे. आता या संपूर्ण संचाचे ' निर्देशन ' वा 'जनन' करायचे, तर ( २क्ष-१; क्ष≠० ) या नियमाने ते होऊ शकेल. या नियमामुळे सर्व विषम संख्यांचे जनन होते व विषम संख्यांशिवाय इतर कोणत्याही संख्यांचे जनन होत नाही. ज्या नियमानुसार वा सूत्रानुसार हे निर्देशन वा जनन होते, त्याला निर्देशनसूत्र वा जननसूत्र म्हणता येईल. व्याकरणापाशी या प्रकारचे निर्देशनसामर्थ्य वा जननसामर्थ्य असायला हवे, याचा अर्थ असा, की या व्याकरणामुळे भाषेमध्ये शक्य असणाऱ्या सर्व रचना निर्देशित व्हायला हव्यात, आणि फक्त शक्य असणाऱ्या रचनाच निर्देशित व्हायला हव्यात (all and only the possible strings). भाषेतील सर्व आणि फक्त सुरचित ( well-formed ) रचनांचे जनन करण्याच्या व्याकरणाच्या सामर्थ्याला ' दुर्बल निर्देशनसामर्थ्य / जननसामर्थ्य ' ( weak generative capacity ) म्हणतात. परंतु मानवी भाषांचे व्याकरण केवळ एवढ्यावरच थांबू शकणार नाही. या व्याकरणाने भाषेत शक्य असणाऱ्या प्रत्येक सुरचित रचनेचे सुव्यक्त असे वर्णन ( explicit structural description ) द्यायला हवे. व्याकरणाच्या या सामर्थ्याला ' सबल निर्देशनसामर्थ्य / जननसामर्थ्य ' ( strong generative capacity ) म्हणतात.

### ( इ ) रचनांतरण

व्याकरणिक सिद्धांताने भाषिक व्यवस्थेचे व भाषिक ज्ञानाचे पर्याप्त असे वर्णन देण्यासाठी जो तार्किक वा आकारिक अनुबंध लागेल. त्याचीही चर्चा चॉम्स्की यांनी केलेली आहे. व्याकरणिक अनुबंधाचे काही प्रकार आपण तपासू.

भाषेचा प्रत्यक्ष प्रयोग होत असताना, म्हणजेच आपण भाषा बोलत व ऐकत असताना, वेगवेगळे भाषिक घटक (उदाहरणार्थ, स्वन, शब्द, इ.)एकापुढे एक असे येऊन त्यांची एक





अनुक्रमणिका

साखळी किंवा शृंखला तयार होत असते. भाषेच्या या शृंखलात्मक गुणधर्मावर भर देणारा रेषात्मक किंवा अनुक्रमी स्वरूपाचा ( linear) अनुबंध सहज तयार करता येईल. या अनुबंधात प्रत्येक 'मागील' घटक हा 'लगेच पुढील' घटकाचे नियंत्रण करतो. उदाहरणार्थ,

(६) ही मुलगी हसते.

या वाक्यामध्ये 'ही' या पहिल्या घटकामुळे 'मुलगी' हा शब्द निश्चित वा नियंत्रित झालेला आहे, तर 'मुलगी' या शब्दामुळे 'हसते' हे रूप निश्चित झालेले आहे, असे म्हणता येईल. पहिला घटक 'हा' असता, तर पुढील घटक 'मुलगा' असा निश्चित झाला असता; पहिला घटक 'हे' असता, तर पुढचा घटक 'मुलगे' असा निश्चित झाला असता; 'ह्या' असता, तर पुढील घटक 'मुली' असा निश्चित झाला असता; इत्यादी.

या प्रकारच्या स्पष्टीकरणात्मक अनुबंधाला 'परिमित स्थिती अनुबंध' (Finite State Model) असे म्हणतात. या अनुबंधाचे सर्वसाधारण स्वरूप पुढीलप्रमाणे दाखवता येईल :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (६) (अ) ही | - - - - - → | मुलगी | - - - - - → | हसते. |
| (आ) हा | - - - - - → | मुलगा | - - - - - → | हसतो |
| (इ) ह्या | - - - - - → | मुली | - - - - - → | हसतात |
| (ई) ही | - - - - - → | मुले | - - - - - → | हसतात... |
| स्थिती$_{१}$ | - - - - - → | स्थिती$_{२}$ | - - - - - → | स्थिती$_{३}$ |

परंतु हा अनुबंध फारसा उपयोगाचा नाही. हे लगेच लक्षात येईल. पुढील सकर्मक वाक्य पाहा :

(७) ही मुलगी डबा पोहोचविते.

या वाक्यात 'पोहोचविते' या घटकाचे नियंत्रण 'डबा' या लगेच आधीच्या घटकाने होत नसून त्याच्याही आधीच्या 'मुलगी' या घटकाने होते, ही गोष्ट उघड आहे. अकर्मक वाक्यातही हेच दाखविता येईल :

(८) ही दोन वेण्या घालणारी मुलगी हसते.

या वाक्यामध्ये 'ही' या शब्दापुढे 'दोन' असा शब्द आला असला, तरी त्यांच्यातील नाते 'ही' आणि 'मुलगी' यांच्यातील नात्यासारखे नाही. 'दोन' या शब्दाऐवजी

‘मोठ्या’ असा शब्द वापरला तर ही गोष्ट अधिकच उघड होईल. एक अधिक गुंतागुंतीचे उदाहरण पाहा :

(९) हा मुलगी असण्याचा प्रश्न नाही.

येथे ‘हा’ व ‘मुलगी’ हे शब्द एकापुढे एक येत असले तरी वस्तुत: ‘हा’चा संबंध लगेच पुढे येणाऱ्या ‘मुलगी’ या शब्दाशी नसून ‘प्रश्न’ या शब्दाशी आहे. या वाक्यात (हा...प्रश्न नाही) अशी एक रचना आणि (मुलगी असणे) ही दुसरी रचना यांचा संयोग झालेला आहे, ही गोष्ट उघड आहे. वाक्याच्या पोटात वाक्य, अशी रचना येथे आहे.

या प्रकारच्या रचना फक्त मराठीमध्येच आढळतात, असे नव्हे. सर्वच मानवी भाषांमध्ये अनुक्रमी वा रेषात्मक अनुबंधाच्या चौकटीमध्ये बसू न शकणाऱ्या रचना आढळतात. तेव्हा हा अनुबंध मानवी भाषेचे पर्याप्तपणे निर्देशन करू शकणार नाही. व्याकरणिक अनुबंध पर्याप्त ठरायला हवा असेल, तर अनुक्रमापलीकडे जाणाऱ्या काही रचनात्मक संबंधांची त्यामध्ये दखल घेतलेली असली पाहिजे.

भाषेमध्ये शब्द एकापुढे एक या अनुक्रमाने येत असले, तरी प्रत्येक शब्दाचा दुसऱ्या शब्दाशी असणारा संबंध सारख्याच प्रकारचा नसतो, हे आपण पाहिले.

(१०) ही दोन वेण्या घालणारी मुलगी हसते.

या वाक्याची रचना (ही→ दोन→ वेण्या → घालणारी→ मुलगी→हसते) अशा तऱ्हेने निर्देशित करणे योग्य ठरणार नाही. ‘मुलगी’ या मुख्य पदाचाच विस्तार होऊन ‘ही मुलगी’,‘ही वेण्या घालणारी मुलगी’, ‘ही दोन वेण्या घालणारी मुलगी’, या प्रकारच्या रचना तयार होतात. भाषेचा हा गुणधर्म जर व्याकरणाच्या कक्षेत आणायचा असेल, तर केवळ सुट्या सुट्या शब्दांच्या अनुक्रमावर आधारलेला व प्रत्येक शब्दाला सारख्याच प्रकारचे स्थान वा दर्जा देणारा रेषात्मक अनुबंध उपयोगी पडणार नाही. त्यासाठी शब्दबंधाच्या किंवा पदबंधाच्या कल्पनेवर आधारलेला व्याकरणिक अनुबंध ( phrase structure model ) तयार करून पाहायला हवा. यात अनुक्रम असेल, पण तो सुट्या शब्दांचा नव्हे. तर पदबंधांचा अनुक्रम असेल. केवळ सुट्या शब्दांच्या अनुक्रमाचा नियम बनवायचा असेल, तर पुढीलप्रमाणे सूत्र–रचना येईल.

(नियम$_{१}$ ) वाक्य→ नाम + क्रियापद.

वाक्य हे नाम व क्रियापद या दोन घटकांचे बनलेले असून आधी नाम व नंतर क्रियापद अशा क्रमाने त्याची रचना झालेली असते, असा या नियमाचा अर्थ आहे. परंतु वाक्यात केवळ नामच असेल, असे नाही, तर त्या नामाचा विस्तारही असू शकेल (जसे : ही दोन वेण्या घालणारी मुलगी); त्याचप्रमाणे क्रियापदाचाही विस्तार असू शकेल (जसे : हसते आहे, हसली असेल, हसली होती, इत्यादी). या दोन्ही विस्तारित रचनांमध्ये 'मुलगी' हे नाम व 'हस' हा धातू हे आवश्यक व प्रमुख घटक आहेत, तर इतर घटक वैकल्पिक आहेत; म्हणजेच प्रत्येक घटकाचा दर्जा सारखाच नाही. ही गोष्ट आपल्याला सूत्रात पकडता आली पाहिजे. तेव्हा आपले वरील नियमसूत्र थोडे सुधारून लिहू.

(नियम$_{२}$) वाक्य→ नामपदबंध + क्रियापदबंध.

हेच सूत्र एका विशिष्ट प्रकारच्या (ऊर्ध्वमूल) वृक्षाकृतीनेही दर्शविता येईल.




याला आणखी दोन विस्तारसूत्रांची जोड द्यावी लागेल, ही गोष्ट तर उघडच आहे. ही सूत्रे म्हणजे नामपदबंधाची व क्रियापदबंधाची रचना निर्देशित करणारी सूत्रे होत.

(नियम$_{३}$) नामपदबंध → (सर्वनाम) + (विशेषण) + नाम
(नियम$_{४}$) क्रियापदबंध → (कर्मनामबंध$_{१}$) + (कर्मनामबंध$_{२}$) + धातू + सहायक

अशा प्रकारची नियमसूत्रे रचता येतील. कंसांचा उपयोग येथे विकल्प दर्शविण्यासाठी केला आहे. नामपदबंधामध्ये नाम हा आवश्यक घटक, तर सर्वनाम व विशेषण हे वैकल्पिक घटक असतात, हे पहिल्या सूत्रात दर्शविले आहे. दुसऱ्या सूत्रातही कर्मनामबंध हे वैकल्पिक घटक दाखविले आहेत, कारण धातू हे अकर्मक वा सकर्मक असू शकतात, आणि सकर्मकांतही एक किंवा दोन कर्मे विकल्पाने येऊ शकतात. अधिक तपशिलात शिरायचे, तर या सूत्रांमध्ये विविध विकारांची दखलही घ्यावी लागेल, व त्यानुसार सूत्रांमध्ये सुधारणा करावी लागेल. आपण येथे फक्त नमुन्यादाखल म्हणून उदाहरणे घेत आहोत.[५]

पदबंधरचनेवर आधारलेला हा व्याकरणिक अनुबंध रेषात्मक अनुबंधापेक्षा अधिक सामर्थ्यशाली आहे, यात शंकाच नाही. एक म्हणजे रेषात्मक अनुबंधामधील अनुक्रमाची

संकल्पना येथे पूर्णतया सोडून दिलेली नाही; तेव्हा भाषेच्या त्या पैलूचे स्पष्टीकरण तर या दुसऱ्या अनुबंधातून मिळतेच; त्याशिवाय इतर काही व्याकरणिक संबंधांचाही वेध या अनुबंधाने घेतलेला आहे. उदाहरणार्थ,

( ६ ) ही मुलगी हसते.

हे वाक्य तीन शब्दांचे असले, तरी तिची मूलभूत रचना दोन घटकांची आहे; (ही मुलगी) हा एक घटक, तर ( हसते ) हा दुसरा घटक.

( ८ ) ही दोन वेण्या घालणारी मुलगी हसते.

या वाक्यातही मूळ रचना दोन घटकांची आहे : ( ही दोन वेण्या घालणारी मुलगी ) हा एक घटक, तर ( हसते ) हा दुसरा घटक. वरील दोन वाक्यांत फरक आहे तो पहिल्या घटकाच्या पदबंधरचनेत आहे. ( ही दोन वेण्या घालणारी मुलगी ) या वाक्यांशामध्ये एक विशेषणपदबंध आलेला आहे; तो म्हणजे ( दोन वेण्या घालणारी ). वेगवेगळ्या प्रकारचे कंस वापरून हा फरक पुढीलप्रमाणे दर्शविता येईल.

( ६ ) [ ( ही मुलगी ) ( हसते ) ]

( ८ ) [ { ( ही ) ( < दोन वेण्या घालणारी > < मुलगी >) } { हसते } ]

किंवा हीच माहिती वृक्षाकृतीच्या साहाय्यानेही दर्शविता येते.



(८) ही दोन वेण्या घालणारी मुलगी हसते.




वरील वाक्याचे पूर्ण विश्लेषण केलेले नाही, हे ध्यानात ठेवायला हवे. उदाहरणार्थ विशेषणपदबंधाचे आणखी पुढे जाऊन विश्लेषण करायला हवे.

[ ( दोन ) (वेण्या ) ] [ घालणारी ]

परंतु अगदी तपशीलवार विश्लेषण देणे, हा आपला हेतू नाही. दिले आहे तेवढे विश्लेषण एकूण अनुबंधाची कल्पना यायला पुरेसे ठरावे.

पदक्रमावर आधारलेल्या व्याकरणापेक्षा पदबंधावर आधारलेले व्याकरण अधिक सामर्थ्य-शाली आहे, हे आणखी एका प्रकारे दाखवून देता येईल. पुन्हा आपण संख्यांचेच उदाहरण घेऊ. संख्या आणि गणिती चिन्हे यांचा पुढील अनुक्रम पाहा :

(९) २ × २ + ३

हा अनुक्रम संदिग्ध आहे, असे म्हणता येईल. कारण आपण कंस टाकण्याची क्रिया कोणत्या प्रकारे करणार, यावर अंतिम संख्या अवलंबून राहील.

(९) (अ) [ २ ] × [ २ + ३ ] = १०

(आ) ( २ × २ ] + [ ३ ] = ७

भाषेमध्येही या प्रकारची संदिग्धता ( याला अनेकार्थताही म्हणता येईल ) आढळू शकते. उदाहरणार्थ,

[ ११ ] उंच मुले आणि मुली

या रचनेचे विश्लेषण केवळ क्रमानुसारी केले, तर या संदिग्धतेचे स्पष्टीकरण मिळणार नाही :

उंच ---→ मुले ---→ आणि ---→ मुली

परंतु पदबंधावर आधारून विश्लेषण केले, तर मात्र दोन रचना हाती लागतात, व त्यामुळे दोन अर्थांचे स्पष्टीकरण मिळून संदिग्धतेचे निरसन होते, असे म्हणता येईल :

[ ११ ] (अ) [ उंच ] [ मुले आणि मुली ]
(आ) [ उंच मुले ] [ आणि ] [ मुली ]

पदबंधात्मक व्याकरणिक अनुबंध हा काही चॉम्स्की यांचा स्वतःचा शोध नव्हे. अमेरिकन संरचनावादी भाषावैज्ञानिकांनी 'प्रथमोपस्थित घटक विश्लेषण' (Immediate Constituent Analysis) या नावाने ओळखली जाणारी जी वाक्यविश्लेषणाची पद्धती विकसित केली होती, ती याच स्वरूपाची होती.[६] परंतु तिला अधिक आकारिक स्वरूप देऊन अधिक सुव्यक्त रूपात मांडण्याचे फार महत्त्वाचे कार्य चॉम्स्की यांनी केले. परंतु चॉम्स्की यांचे हे कार्य म्हणजे खरे पाहता पूर्वपक्ष चोखपणे मांडण्याचे कार्य होते – किंबहुना तोवर कोणालाही मांडता आला नव्हता, इतक्या नेटकेपणे गणिती सूत्रबद्धतेचा आधार घेऊन त्यांनी तो मांडला. या अनुबंधाची अशी आकारिक पद्धतीने मांडणी केल्यानंतर त्याच्या मर्यादाही चॉम्स्की यांनी नेमकेपणे दाखवून दिल्या.

टीपा

1. 'A language is a dialect with an army and a navy' या वचनाचा जनक Max Weinreich होता, असे मानले जाते. पाहा : Chomsky, 1986 : 15.

२. वर्तनवादी मनोविज्ञानाचे आघाडीचे अभ्यासक बी. एफ्. स्किनर यांचा Verbal Behaviour हा ग्रंथ म्हणजे वर्तनवादी भाषिक विश्लेषणाचा उत्कर्षबिंदू होय. प्रायोगिक मनोविज्ञानाच्या आधारे स्किनर यांनी केलेले विवेचन आणि चॉम्स्की यांनी केलेले त्याचे खंडन हा स्वतंत्र लेखाचाच विषय असल्याने येथे त्यांचा परामर्श घेतलेला नाही. पाहा : Skinner, 1957; Chomsky 1958.

3. "..... .languages can differ with limit and in unpredictable ways" Joos, 1957 : 96

४. पाहा, Lees, 1957; Kuhn 1962; Chomsky, 1964; Hempel, 1966.

५. मराठीच्या संदर्भात या सूत्रांच्या मांडणीसाठी पहा : इंदापूरकर, १९८२; धोंडगे, १९८३.

६. मराठीत या पद्धतीचा परिचय कल्याण काळे यांनी करून दिलेला आहे; पाहा : काळे, १९८२.

## संदर्भ


### मराठी

इंदापूरकर, चं. द. १९८२. 'वाक्यविचार'. मालशे, इनामदार, सोमण १९८२ मध्ये समाविष्ट : पृ. ७८–९७.

काळे, कल्याण १९८२. "वाक्यविन्यास". काळे व सोमण, १९८२ मध्ये समाविष्ट : पृ. १०३–१२७.

काळे, कल्याण व अंजली सोमण (संपा.) १९८२. **वर्णनात्मक भाषाविज्ञान : स्वरूप आणि पद्धती.** नासिक : गोखले एज्युकेशन सोसायटी.

केळकर, अशोक रा. १९८२ **वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार,** मुंबई : मॅजेस्टिक.

धोंगडे, रमेश १९८३. **अर्वाचीन मराठी : एक भाषावैज्ञानिक अभ्यास.** पुणे : म. वि. ग्रं. नि. मं व कॉन्टिनेन्टल

मालशे, मिलिंद स. १९८२ (अ) "भाषा : स्वरूप, कार्य व अभ्यास" काळे व सोमण (१९८२) मध्ये समाविष्ट. पृ. ९–४०.

१९८२ (आ) "वर्णनात्मक भाषाविज्ञानपद्धती : भूमिका व स्वरूप" मालशे, इनामदार, सोमण (१९८२) मध्ये समाविष्ट. पृ. ९–३३.

१९८८–८९ 'मानसिक प्रतिरूपे' (चॉम्स्की यांच्या 'Mental Representations' या लेखाचे भाषांतर) **अनुष्टुभ,** दिवाळी १९८८, पृ. ४१-५४ व जाने.-फेब्रु. १९८९, पृ. २७-३६.

मालशे, स. गं., हे. वि. इनामदार व अंजली सोमण (संपा.) १९८२. **भाषाविज्ञान : वर्णनात्मक आणि ऐतहासिक.** पुणे : संजय प्रकाशन.

### इंग्लिश

Bach, E. and R. T. Harms (eds.) 1968. **Universals in Linguistic Theory.** N Y. : Holt, Rinehart and Winston.

Bloomfield, L. 1928 'A Set of Postulates for the Science of Language,' **Language,** 2; in Joos, M.(ed) **Readings in Linguistics,** Washington.

— 1933 **Language,** New York : Holt, Rinehart & Winston
Boas, Franz 1991 **Handbook of American Indian Languages,** Washington, D. C. : Smithsonian Institute.

Chomsky, Noam 1957 **Syntactic Structures,** Paris : Motoun.

—1958 " A Review of B. F. Skinner's **Verbal Behaviour,**" **Language,** 35 : 26-58, Included in Fodor & Katz, 1964 547-578.

- 1964 **Current Issues in Linguistic Theory,** Paris: Motoun.

- 1965 **Aspects of the Theory of Syntax.** Cambridge, Mass. : MIT Press.

- 1972 ( a ) **Language and Mind.** New York : Harcourt Brace Jovanovich, ( Enlarged Ed; 1st ed. 1968 )

- 1972 ( b ) **Studies in Semantics in Generative Grammar.** The Hague, Paris : Mouton.

- 1979 **Language and Responsibility.** New York : Pantheon.

- 1982 **Lectures on Government and Binding.** Dordrecht: Forris.

- 1986 **The Knwledge of Language.** N. Y. : Praeger.

Hempel, C. G. 1966. **Philosophy of Natural Science.** Englewood Cliffs : Prentice—Hall.

Joos, M. ( ed. ) 1966 **Readings in Linguistics I.** Chicago & London : Chicago University Press. ( First Published 1957. )

Kuhn, Thomas 1962. **The Structure of Scientific Revolutions.** Chicago : The University of Chicago Press.

Lakoff, G. 1971. ' On Generative Semantics. " In Steinberg and Jacobovits 1971.

Lees R. B 1957 ' Review of Chomsky's **Syntactic Structures. Language.** 33 : 375—408.

Lyons, John 1977. **Chomsky.** Harmondsworth : Penguin.

McCawley, J. D 1968. " The Role of Semantics in a Grammar. " In Bach and Harms 1968.

Saussure, F. de. 1974 **Course in General Linguistics.** ( Tr. from French by Wade Baskin) Fontana/Collins.

Skinner, B. F. 1957. **Verbal Behaviour.** New York : Appleton-Century Crofts.

Steinberg, D. D. & L. A. Jakobovits (eds.) 1971. **Semantics : An Interdisciplinary Reader in Philosophy, Linguistics. and Psyohology.** London : Cambridge University Press.

मानव्य आणि सामाजिक विज्ञान विभाग, आय्. आय्. टी., पवई, मुंबई ४०००७६

( पृ. ५८ वरून )

पत्रिकेची वर्गणी यांत नाइलाजाने वाढ करावी लागत आहे. हा बदल १ जुलै, १९९१ पासून अमलात येत आहे. परिषदेच्या सभासदांनी व पत्रिकेच्या वाचकांनी कृपया याची नोंद घ्यावी. वाढीव दराची माहिती आवरण पृष्ठ तीनवर दिली आहे.

याच संदर्भात परिषदेच्या जुन्या आजीव सभासदांना आवाहन करण्यात येत आहे. परिषदेची व तिच्याबरोबरच पत्रिकेची आर्थिक स्थिती फारशी समाधानकारक कधीच नव्हती. कागद, मुद्रण व टपाल–हशील यांवरील खर्च प्रमाणाबाहेर वाढल्याने ती आणखीनच बिघडली आहे. आपण दिलेल्या वर्गणीच्या व्याजातून हा खर्च भागवता येणं कठीण झालं आहे. म्हणून वर्गणीचे दर वाढवावे लागले आहेत. पत्रिकेची व परिषदेची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी आपलाही हातभार लागावा. तरी विनंती, की ही वाढीव वर्गणी विचारात घेऊन जास्तीची रक्कम स्वच्छेने परिषदेकडे पाठवावी. पत्रिकेचा आपल्या स्नेह्यासोबत्यांमध्ये प्रचार करून, आणि वेळोवेळी पत्रिकेला जाहिराती मिळवून देऊनही आपण पत्रिकेला मदत करावी, हे आवाहन तर कायमचेच आहे, असे समजावे.

पत्रिकेचे मागील अंक हवे असल्यास पाठवण्यात येतील. प्रत्येक सुट्या अंकाची किंमत १५ रु. अशी राहील. हे अंक एरवी साध्या बुकपोस्टाने पाठवले जातात. जर रजिस्टर्ड पोस्टाने अंक हवे असतील, तर तो खर्च ग्राहकाला द्यावा लागेल. मात्र आपली मागणी ६० रु. किंवा त्याहून अधिक किमतीची असेल, तर दहा टक्के सवलत दिली जाईल आणि ते अंक आम्ही आमच्या खर्चाने रजिस्टर्ड पोस्टाने पाठवू.





अनुक्रमणिका

# साहित्यकृतीचे भाषांतर : एक प्रवर्तरूप

ल. स. देशपांडे

## १. भाषांतर म्हणजे छाया

भाषांतराला संस्कृतमध्ये 'छाया' म्हणतात. 'छाया' म्हणजे प्रतिमा, प्रतिबिंब. मूलकृतीशी ते एकरूप असेलच, असे नाही. समरूप मात्र असावे, अशी अपेक्षा असते. पण ही समरूपता सापेक्ष असते; म्हणून 'भाषांतर' समरूप असते असे, म्हणण्याऐवजी प्रतिरूप असते, असे म्हणणे जास्त सयुक्तिक होईल. पण साहित्यकृतीचे भाषांतर प्रतिरूप म्हणून संबोधणेही धार्ष्ट्याचे होईल; ते मूलकृतीचे अनुकरण वा सादरीकरण नसते; ते तिचे एक प्रवर्त रूप असते असे म्हणणे जास्त उचित ठरेल. हे विधान उपयोजित भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून मांडलेले सत्य म्हणून आपणांस समजून घ्यावयाचे आहे.

## २. भाषांतराचे प्रकार

रोमान यकॉब्सन ह्या प्रख्यात भाषाशास्त्रज्ञाच्या मते भाषांतराचे तीन प्रकार संभवतात : एक, भाषांतर्गत, म्हणजे संहितेचे त्याच भाषेच्या एका रूपातून दुसऱ्या रूपात होणारे स्थित्यंतर, उदा. तेराव्या शतकातील मराठीत ज्ञानेश्वरलिखित 'अमृतानुभवा'चे विसाव्या शतकातील मराठीत विंदा करंदीकरांनी केलेले भाषांतर. दोन आंतरराष्ट्रीय, म्हणजे एका भाषेतून दुसऱ्या, वेगळ्या भाषेत केलेले भाषांतर, उदा. गो. ग. आगरकरांनी शेक्स्पिअरच्या 'हॅम्लेट'चे 'विकारविलसित' म्हणून केलेले मराठीतील भाषांतर. आणि तीन, आंतर-रूपीय म्हणजे एका कलामाध्यमातून दुसऱ्या कलामाध्यमात सादर केलेले समान-आशयनिबद्ध रूपांतर, उदा. बालकवींच्या 'फुलराणी' ह्या कवितेला नृत्य-नाट्य-संगीतातून सादर करण्याचा श्रीमती कांचन सोनटक्के ह्यांचा प्रयत्न.

सर्वसामान्यपणे, भाषांतर-प्रक्रियेत दोन भाषा अनुस्यूत असतात. जिच्यातून भाषांतर केले जाते ती मूळभाषा. जिच्यात भाषांतर केले जाते ती ग्राहकभाषा. ह्या भाषा भिन्नवंशीय असतील, तर भाषांतराचे स्वरूप व समस्या त्या समवंशीय असतील त्यापेक्षा अधिक गंभीर, आणि वेगवेगळ्या असतील. तेव्हा भाषांतराचे नेमके स्वरूप व त्यात उद्भवणाऱ्या विविध अडचणी आपणांस समजून घ्यावयाच्या आहेत.

साहित्य-भाषांतर आणि साहित्येतर भाषांतर असे भाषांतराचे प्रामुख्याने दोन प्रकार संभवतात. त्यांतील साहित्य-भाषांतराचाच आपणास इथे अभ्यास करावयाचा आहे.





अनुक्रमणिका

## ३. साहित्य-भाषांतर

साहित्य-भाषांतराचा अभ्यास करण्यासाठी पूर्वतयारी म्हणून आपणांस साहित्य-भाषेचे स्वरूप, तिची घटना, तिची वैशिष्ट्ये इत्यादी गोष्टी समजून घ्याव्या लागतील.

### ३.१ भाषा : भाषाशास्त्रीय संकल्पना

'साहित्य-भाषा' समजून घेण्यासाठी आपणांस 'भाषे'चा एक भाषाशास्त्रीय कल्पना म्हणून अभ्यास करावा लागेल. ध्वनि-माध्यम असलेले संज्ञापनाचे साधन म्हणून सर्व-साधारणपणे भाषेकडे पाहिले जाते. संरचनांची संरचना असे तिचे स्वरूप असते. विविध स्तरांवर तिचा अभ्यास केल्यास तिचे खरे स्वरूप आपणांस उलगडत जाते. एकेका स्तरावर एकेका संरचनेचा अभ्यास होतो म्हटले, तरी चालेल. भाषेचे हे स्तर असे :

(१) ध्वनी, (२) शब्द, (३) शब्द-रूप-घटन, (४) वाक्य, (५) वाक्यसमूह किंवा परिच्छेद, आणि (६) अर्थ.

'भाषा' ही संकल्पना समजून घेताना आपणांस भाषा-सामुग्रीचाही विचार करावा लागेल. तत्संबंधीच्या वर्गीकरणात अनेक घटक-उपघटकांचा सूक्ष्म अभ्यास अनिवार्य ठरतो. भाषा-सामग्री विचाराचे पायाभूत वर्ग असे :

(१) संरचना, (२) कार्ये, (३) पर्याय शोधन किंवा निवड, आणि (४) पद्धती.[२]

#### ३.१.१ भाषा : एक संरचना

भाषेच्या संरचनेचा विचार तिच्या मूलघटकांना अनुसरून करावा लागतो. हे मूलघटक म्हणजे (अ) ध्वनी, (ब) शब्द आणि शब्दार्थ, (क) शब्दबंध, वाक्यांश, वाक्य आणि ह्या तिन्हींचे अर्थ, आणि (ड) वाक्यसंघटन व त्यातील तर्कसंगती.

#### ३.१.२ भाषेची कार्ये

भाषेच्या कार्यांचा विचार तिच्या प्रयोजनाच्या संदर्भात करावयाचा असतो. भाषेची अभिव्यक्ती विविध प्रकारे संभवते, उदा. आत्मनिष्ठ, वस्तुनिष्ठ, ज्ञानप्रसारी, आग्रही, आवाहक, तार्किक आणि कलात्म.

#### ३.१.३ भाषेची निवड

भाषेच्या निवडीत पर्याय-शोधन अभिप्रेत आहे. शब्दांचे संदर्भानुसारी सहअस्तित्व म्हणजेच साहचर्य किंवा सहवर्तित्व. लोकानुसारी भाषाभेद, उपयोगानुसारी भाषोपयोजन आणि शैली ह्या संकल्पनांच्या संदर्भात भाषेच्या निवडीचा विचार अभ्यासावा लागतो.

### ३.१.४ भाषेच्या पद्धती

भाषेच्या पद्धतीचा विचार करताना विविध आविष्कार-पद्धती लक्षात घ्याव्या लागतात. विधान, प्रश्न, उद्‌गार इत्यादी अर्थी वाक्यरचना, तर्कसंगती, लयबद्धता, साम्य, विरोध, उपरोध, उपहास इत्यादी दर्शी रचना-हे आणि ह्यासारखे अन्य सर्व प्रकार आविष्कार-पद्धतींची उदाहरणे म्हणून समजून घेता येतील.

### ३.२ भाषेचे प्रकार

उपयोगानुसार भाषेचे तीन भेद संभवतात. दैनंदिन व्यवहारात वापरली जाते ती व्यवहार भाषा; ज्ञान, विज्ञान, तंत्रज्ञान आदींचे माध्यम असणारी शास्त्र-भाषा; तसेच साहित्य जीतून निर्माण होते ती साहित्य-भाषा.[३]

### ३.२.१ व्यवहार-भाषा

व्यवहार-भाषेतील शब्द कधी चपलल, तर कधी ढिसाळ असतात. ते कधी स्पष्ट आणि निश्चित, तर कधी अस्पष्ट आणि अनिश्चित अर्थवाही असतात. तीत सर्वसाधारण भावभावना आणि विचार प्रकट होत असतात. संदेशवहन हे व्यवहार-भाषेचे सर्वांत महत्त्वाचे सामाजिक कार्य आहे असे म्हणता येईल.

### ३.२.२ शास्त्रभाषा

शास्त्रभाषेतील शब्द सरळ, स्पष्ट आणि निश्चित अर्थसूचक असतात. तीतील चिन्हचिन्हित भाव विशिष्ट अर्थसूचकच असतो. भावनांचे नाही तर चिंतनाचे, कल्पनांचे नाही तर संकल्पनांचे ती माध्यम असते.

### ३.२.३ साहित्यभाषा

परंपरेने विचार करता साहित्यभाषा दोन रूपांत आढळते; एक वाचिक, दुसरे लिखित. साहित्य-भाषेत कधीकधी ह्या दोहींची सरमिसळ झालेलीही पाहावयास मिळते.

साहित्यभाषा स्वभावतः काहीशी वक्र, अस्पष्ट, अनिश्चित आणि संदिग्ध असते. व्याकरणदृष्ट्या तीत काही मोडतोड करून रचनावैचित्र्य निर्माण केले जाते. परिणामतः ती अधिक प्रभावी, अधिक लक्ष्यवेधी होते. रसिकमनाला वैचारिकदृष्ट्या उजाळा आणणे आणि भावनिकदृष्ट्या साद घालणे ही साहित्यभाषेची महत्त्वाची कार्ये होत. आविष्करण हा तिचा आत्मा असतो. तिच्याद्वारे होणारे संज्ञापन सर्वोच्च प्रकारच्या संज्ञापनांपैकी एक म्हणून समजले जाते.



अनुक्रमणिका

## ४. साहित्यभाषांतर : एक अग्निपरीक्षा

आतापर्यंत आपण भाषा आणि साहित्यभाषा ह्यांचे स्वरूप, संरचना आणि त्यांच्या भाषाशास्त्रीय अभ्यासाची चौकट पाहिली. भाषांतर–प्रक्रियेत दोन भाषांचा संबंध येतो, त्यातून ज्या समस्या निर्माण होतात त्यांचे स्वरूप आपणांस ह्या अभ्यासाच्या चौकटीत समजून घेतले पाहिजे. साहित्य-भाषांतर प्रक्रियेत तर ह्या समस्या काहीसे उग्र-गंभीर रूप धारण करून जटिल बनतात. पण भाषांतरकार त्यांना सामोरे जाऊन आपला मार्ग काढतो. त्याच्यासाठी ती अग्निपरीक्षा असते आणि तीस तो कमी-जास्त यशस्वीरित्या सामोरा जातो.

ह्या अग्निपरीक्षेत कस लागतो ते भाषांतरकाराच्या द्विभाषाप्रभुत्वाचा, संबद्ध संस्कृति-ज्ञानाचा आणि वाङ्मयीन, सौंदर्यवेधी संवेदनाचा. त्याला केवळ आशयाकडे नाही तर अभिव्यक्तीकडेही लक्ष द्यावे लागते. भाषेच्या वेगवेगळ्या स्तरांवर आढळणारा आशय त्याच भाषेत पण अन्य शब्दांत सांगणे जेवढे अवघड, त्यामानाने तोच आशय पण अन्य भाषेत सांगणे त्यापेक्षाही जास्त अवघड. त्यामुळेच कवितेचा अर्थ सांगणे कठीण, तर तिचे भाषांतर करणे महाकठीण कर्म समजले जाते. म्हणून भाषांतरकाराचे काम मूळ लेखकाच्या कामगिरीपेक्षा कधी कधी जास्त जिकिरीचे आणि गुंतागुंतीचे होऊन बसते. ह्याशिवाय मूळ साहित्यकृतीचा काळ, ज्या वाङ्मयीन परंपरेत तिचा जन्म झाला व ती जोपासली गेली ती वाङ्मयीन परंपरा, लेखकाचे प्रयोजन, पुढे आलेल्या पिढ्यांतील वाचकवर्गावर पडलेला तिचा प्रभाव आणि सरतेशेवटी, ज्या वाङ्मय-प्रकारात ती मोडते, त्यात तिने घातलेली भर ह्या सर्वांचे आकलन वा किमान भान त्यास असले पाहिजे.

सापेक्षतः बोलावयाचे झाल्यास, आदर्श भाषांतरकृती मूळ साहित्यकृतीशी फार इमान राखून किंवा तिच्यापासून फार मोकळी अशी असू शकत नाही. अतिशय विश्वसनीय भाषांतर- केवळ शब्दशः किंवा/आणि वाक्यशः केलेले असेल, तर वाचनीयता आणि रसास्वादाच्या दृष्टीने शबलित झालेले असते. तसेच अतिशय मुक्त भाषांतर भाषांतर राहत नाही, रूपांतर होते. मूळ साहित्यकृतीतील भाषागत सांस्कृतिक विशिष्टता फ्रेंच वाङ्मयेतिहासकार आणि समीक्षक टेनच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास ' वंश, काळ आणि स्थळ 'ह्यांशी निबद्ध अशी-ग्राहक भाषेत आविष्कार शोधते. गटे ह्या विश्वविख्यात जर्मन साहित्यिकाला भाषांतर–समस्येच्या ह्या अंगाची चांगली जाण असलेली दिसते. भाषांतर–प्रक्रियेत ज्या दोन भाषांत क्रियाप्रतिक्रिया किंवा साद-प्रतिसाद संबंध निर्माण होतात, त्या जर वांशिकदृष्ट्या भिन्न असतील, तर ही समस्या अधिकच भेडसावते. उपलब्ध दोन पर्यायांपैकी कोणता पर्याय निवडायचा हा भाषांतरकारासमोरचा खरा प्रश्न आहे, असे गटेला वाटते. तो म्हणतो :

' अन्य राष्ट्राचा लेखक आपलाच समजून आपल्या राष्ट्रात आणणे हा एक पर्याय; आणि आपणच परराष्ट्राच्या लेखकाकडे जाऊन त्याची परिस्थिती, निवेदन-शैली आणि अन्य सारी वैशिष्ट्ये समजून घेतली पाहिजेत व त्याचा जसाचा तसा स्वीकार केला पाहिजे, हा दुसरा पर्याय. '[४]

वरील पर्यायांची उत्कृष्ट उदाहरणे क्रमशः अशी : पार्शिअन भाषेतील उमर खय्यामच्या 'रुबय्यत'चे एडवर्ड फिट्ज्जेरल्डकृत इंग्लिश भाषांतर आणि रवींद्रनाथ टागोरांच्या काही बंगाली कथांचे सी. एफ्. अँड्र्यूजकृत इंग्लिश भाषांतर. पण आपण मूळ भाषेतील साहित्य-कृती आणि ग्राहकभाषेतील तिचे भाषांतर ह्यांचा तौलनिक भाषाशास्त्राच्या दृष्टिकोनातून मूल्यात्म अभ्यास केला, तर साहित्य-भाषांतर प्रक्रियेतील त्रुटी आणि तिच्या मर्यादा आपल्या सहज लक्षात येतील. त्यामुळे गटेचे वर उद्धृत केलेले विधान तार्किकदृष्ट्या कितीही समर्थनीय असले, तरी प्रत्यक्ष अडचणी सोडवण्याच्या दृष्टीने मार्गदर्शक ठरत नाही. आशय-समानता प्रस्थापित करणे हा साहित्यकृतीच्या भाषांतरकारासमोरचा खरा, भेडसावणारा प्रश्न असतो. त्याला केवळ समग्र साहित्यकृतीचाच नव्हे, तर भाषेच्या विविध स्तरांवर वावरणाऱ्या सर्व घटक, उपघटकांचाही विचार करावा लागतो. उदाहरणार्थ : ध्वनी, शब्द, शब्दबंध, वाक्य, वाक्यबंध, परिच्छेद आणि अंतिमतः सारी लेखनकृती ह्या सर्व भाषिक स्तरांवर निर्माण होणाऱ्या साऱ्या समस्यांना सामोरे जावे लागते.

## ५. भाषिक सापेक्षता : एक अडचण

म्हणी, सुभाषिते, वाक्संप्रदाय, इत्यादींमधून प्रत्येक भाषेची स्वयंभू, स्वतंत्र आणि स्वायत्त अशी जडणघडण आणि धाटणी आपल्या लक्षात येते. भाषेच्या ह्या जडणघडणीत काही समाईक तत्त्वे आणि पद्धतशीर रचना जशा आढळतात, तशी काही अनन्यसाधारण आणि तऱ्हेवाईक वैशिष्ट्येही आपणांस पाहावयास मिळतात. मूळ साहित्यकृतीची भाषा आणि ग्राहकभाषा ह्या दोन्हींची जडणघडण आणि धाटणी ह्यात अशा प्रकारे मुळातच असलेली तफावत भाषांतरकाराला प्रथमतः आणि प्राधान्याने जाणवते. दोन भाषांच्या क्रिया-प्रतिक्रियात्मक संबंधांतून निर्माण होणाऱ्या अटळ संघर्षमय परिस्थितीला सामोरे जात तो जागोजागी तडजोडी करतो आणि त्याला पडलेल्या प्रश्नांची कोणत्या ना कोणत्या प्रकारे सोडवणूक करतो. काही समाईक तत्त्वे भाषांच्या संरचनांना पायाभूत असल्यामुळे म्हणजे, प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ रोमॉं यकॉब्सनच्या शब्दांत, 'भाषांच्या समानततत्त्वाधिष्ठततेच्या तत्त्वांमुळे'[५] (isomorphic nature of language) भाषांतर-प्रक्रिया संभवनीय ठरते.

'भाषेची वैश्विक तत्त्वे' (language universals) अशीच एक भाषाशास्त्रीय संकल्पना आहे. तिला अनुसरून मूलभाषा आणि ग्राहकभाषा वांशिकदृष्ट्या ज्या प्रमाणात पर-स्परांना समीप, दूर असतात, त्या प्रमाणात भाषांतर सुकर/दुष्कर असते. एकूण एक बुद्धिगम्य अनुभवाचे आविष्करण करण्याचे म्हणजेच संकल्पनप्रक्रियेचे (conceptualisation) सामर्थ्य मुळातच प्रत्येक भाषेच्या ठिकाणी वसत असते. ह्या दृष्टीने एक भाषा दुसरीपेक्षा वेगळी समजण्याचे कारण नाही, असे मानतात. पण वेगवेगळ्या भाषा बोलणारे लोक एकच

अनुभव वेगवेगळ्या प्रकारे घेताना दिसतात, तशीच त्या अनुभवांची अभिव्यक्तीही आपापल्या भाषांत वेगवेगळ्या प्रकारे करताना दिसतात. म्हणून अनुभव एक पण आशयाभिव्यक्तीच्या तऱ्हा मात्र निरनिराळ्या, अशी एक मजेदार गोष्ट भाषांतरकाराच्या लक्षात येते. त्यामुळेच विविध भाषांच्या भाषकांना सत्य जरी एक असले तरी समान, सारखे असू शकत नाही, असे बेंजमिन वॉर्फसारख्या आंतरराष्ट्रीय कीर्ती असलेल्या अमेरिकन भाषाशास्त्रज्ञालाही जाणवते. भाषांतरकाराच्या समोरच्या प्रश्नाची खरी गोम इथे आहे. अर्थपूर्ण अनुभवाचे संप्रेषण ( communication ) एका भाषेतून दुसऱ्या भाषेत कसे करावयाचे, ही त्याच्या कसोटीची वेळ असते. त्यासाठी त्याच्याजवळ निव्वळ संज्ञापन–कौशल्य असून भागत नाही, तर सर्जनशीलताही हवी असते. दुभाष्याप्रमाणे एका भाषेतील संदेश दुसऱ्या भाषेत करण्याइतपत तात्पुरत्या, ढोबळ स्वरूपाची त्याची जोखीम नसते, तर आशयाभिव्यक्तीचे सारे वैभव, सारा खजिना. तिच्या साऱ्या थाटामाटासह आणि डामडौलासह, एका भाषेतून दुसऱ्या भाषेत त्याला आणावा लागतो. म्हणून मूलभाषेतील संहितेवर त्याचे सारे लक्ष केंद्रित झालेले असते. साहित्यकृतीत साकार झालेले विश्व शेवटी शब्दबद्ध असल्याकारणाने भाषांतर्गत असते. भाषेच्या ह्या उपर्युक्त दुहेरी स्वरूपामुळे–एक सार्वत्रिक ( universal) आणि दुसरे स्वयंनिर्मित ( sui generis ) - भाषांतराच्या शक्यता आणि अशक्यता दोन्हीही संभवतात.:ह्या दोन ध्रुवांमध्ये ' भाषांतरक्षमतेच्या कक्षा ' सतत बदलत्या असतात.

## ६. आशयाचे आव्हान

' आशय ' एक भाषाशास्त्रीय संकल्पना आहे. तिचा अभ्यास करणारे एक शास्त्र आहे. त्यास ' अर्थविज्ञान ' ( semantics ) म्हणतात. अर्थविज्ञानाच्या दृष्टिकोनातून विचार केल्यास भाषांतराची शक्यता समजून घेता येते. भाषांतर शक्य आहे, संभवनीय आहे असे आपण म्हणतो. त्याचे कारण म्हणजे भाषेची दोन अंगभूत वैशिष्ट्ये : ( १ ) आविष्करण शक्ती आणि ( २ ) लवचिकपणा. ' आशया 'संबंधी विचार मांडताना प्रख्यात इंग्लिश समीक्षक आय्. ए. रिचर्ड्सने त्याचे चार घटक असतात, असे सांगितले. ते म्हणजे ( अ ) सूचित भाव ( sense ), ( ब ) प्रयोजन ( intention ), ( क ) भावन ( feeling ) आणि ( ड ) सूर किंवा भाषक-श्रावक संबंधसूचक भावदर्शी रोख ( tone ).[६] हे विवेचन वाक्यगत शब्द आणि संदर्भगत वाक्य ह्या दोहोंनाही सारखेच लागू आहे. संज्ञापनाच्या पातळीवर वाक्यार्थविचार लक्षात घेताना अभ्यासकास विधानाची व्याप्ती, झोत, जोर आणि सूर ह्या गोष्टी ध्यानात घ्याव्या लागतात. शैली-विचाराला स्पर्शून जाणाऱ्या अर्थविज्ञानाच्या ह्या कक्षा आहेत, ह्याची जाता जाता इथे नोंद करावयास काही हरकत नाही.

## ६.१. पर्याय शोधण्याची समस्या

आशयाच्या दृष्टिकोनातून साहित्यकृतीकडे पाहिले असता अनिश्चित अर्थसमुच्चय असलेली रचना म्हणून ती समोर येते. साहित्यभाषेची स्वाभाविक सूचनशक्ती आणि रूपकात्म स्वरूप भाषांतरात जेवढे उघड होतात, तेवढे अन्य कोणत्याही अभ्यासात होत नाहीत. संज्ञापनाच्या पातळीवर दरवेळी काही ना काही नवनवीन सांगणे हा साहित्यकृतीच्या गुणविशेष समजला जातो. साहित्यकृतीच्या बोधनाच्या आणि संज्ञापनाच्या पातळ्यांवरील भाषिक संरचना जसजशा आणि जेवढ्या प्रमाणात भाषांतरकारांच्या लक्षात येतील, तसतसा आणि तेवढ्या प्रमाणात तो आशयाभिव्यक्तीतील त्याच्या अडचणींवर मात करतो. आशयाच्या योग्य हाताळणीसाठी त्याच्याजवळ दोन प्रकारची क्षमता / कौशल्ये अपेक्षित असतात : भाषिक आणि संज्ञापनिक. भाषेच्या ज्या पातळीवर तो भाषांतर करतो, त्या पातळीवर त्यास अनेक पर्याय उपलब्ध असतात. परिणामतः निवड अटळ ठरते. ही निवड कधी बुद्धीला स्मरून, तर कधी अंतःप्रेरणेनुसार, तर अधूनमधून तिच्या औपयोगिक मूल्यानुसार, म्हणजे प्रत्यक्ष परिस्थितीत जशी सुचेल तशी, तो करीत असतो. म्हणून निवडीला शैली-विचारात जेवढे महत्त्व आहे, तेवढेच भाषांतर-मीमांसेतही असल्याचे आपणांस जाणवते.

## ६.२. सममूल्यकांचा शोध

प्रश्नाचा खरा रोख भाषांतरकाराला सामोरे जावे लागणाऱ्या प्रत्यक्षानुभूत परीक्षेवर आहे. भाषिकदृष्ट्या काय योग्य, काय अयोग्य, ह्या सारासार विचारांशी निगडित अशी ती परीक्षा आहे. आशयाच्या दृष्टीने सममूल्यकांचा शोध घेण्यात पुन्हा निवडीचा अत्यंत गुंतागुंतीचा प्रश्न अंतर्भूत असतो. ह्या शिवाय सामाजिक आणि दैनंदिन व्यवहार ह्या गुंतागुंतीत अधिक भर घालतात. ह्यादृष्टीने मूलभाषेत महत्त्वाची असलेली वैशिष्ट्ये भाषांतरकाराला लक्षात घ्यावी लागतात आणि त्यांना अनुलक्षून ग्राहक भाषेत त्याला ती किंवा त्यांची सममूल्यके निर्माण करावी लागतात. ह्या संदर्भात, प्रा. अशोक केळकरांच्या मते, भाषांतरकाराजवळ दुहेरी क्षमता असावयास हवी : एक, ग्राहक क्षमता ( receptive competence ) आणि दुसरी, निर्माणक क्षमता[७] ( productive competence ). ह्यांतील पहिली मूलभाषेशी, तर दुसरी ग्राहकभाषेशी निगडित आहे.

## ६.३. शैलीसंबद्ध अडचणी

भाषेच्या सर्व स्तरांमध्ये शैली-स्तरावर भाषांतरकाराला मात न करता येण्याजोग्या अडचणींना सामोरे जावे लागते. मूलभाषेतील शैलीचे सारे भाषिक नमुने आणि संच निवडून शक्य होतील तितकी त्यांची समांतरके आणि सममूल्यके ग्राहकभाषेत सादर करण्याचे आव्हान भाषांतरकाराला स्वीकारावे लागते. संदर्भ-निबद्ध शैलीच्या खाणाखुणा वा संकेत शैली–





अनुक्रमणिका

निवडीसाठी दिग्दर्शन करतात. ह्या बाबतीत मूळ लेखक आणि भाषांतरकार ह्या दोहोंत काहीसा सारखेपणा पण बरीचशी तफावत पडताना आपणांस आढळते. आपापल्या भाषांची आणि संस्कृतीची पकड त्यांच्या मनावर किती घट्ट असते व भाषांतरकार ती आपल्यापुरती कशी सैल करू पाहतो, हे आपणांस बघावयास मिळते. साहित्य-भाषांतरात शैलीदार वाक्यार्थांना प्रथम रूपपरिवर्तन-प्रक्रियेतून व नंतर विचलन-प्रक्रियेतून आणि सरतेशेवटी सर्जन-प्रक्रियेतून पारित होऊन ग्राहकभाषेच्या दृष्टिकोनातून संस्कारित व्हावे लागते. हे सर्व भाषेच्या-प्रामुख्याने आशयाच्या-विविध स्तरांवर घडत असते. भाषांतरक्षमतेच्या सर्वोच्च कक्षा गाठत, गाठत मूळभाषेतील साहित्यकृती ग्राहकभाषेत प्रवर्तरूप धारण करते.

## ७. भाषांतर–मीमांसा

भाषांतरात अनुस्यूत असलेल्या भाषिक तत्त्वांचा संदर्भ घेऊन जे. सी. कॅटफर्ड ह्या भाषांतर-मीमांसकाच्या भाषांतर-सिद्धांतापर्यंत आता आपण येऊन पोहोचलो. ह्या सिद्धांतातील ' आशयाची समानता ' आणि ' भाषांतर-क्षमतेच्या कक्षा ' ह्या दोन मध्यवर्ती संकल्पनांवर आपण लक्ष केंद्रित करणार आहोत.

भाषांतर मीमांसेच्या अभ्यासात ज्या दोन सिद्धांतांची चर्चा केल्याशिवाय पुढे जाता येणार नाही त्यांच्या जनकांची नावे अशी : एक उपर्युक्त कॅटफर्ड आणि दुसरा, युजिन नायडा. पहिल्याने पूर्वमीमांसा, तर दुसऱ्याने उत्तरमीमांसा सादर केली म्हटले, तर वावगे ठरू नये. साहित्य-भाषांतराचा विचार करताना, मला वाटतं, कॅटफर्डच्या सिद्धांतापेक्षा नायडाच्या सिद्धांताची संबद्धता जास्त महत्त्वाची आहे. कारण तो व्याकरण, संदर्भ, इत्यादी पातळ्यांवरील आशयापलीकडे जाऊन सूचित तसाच शैलीगत आशयाचा विशेषत्वाने विचार करतो. सूचित आशय बराचसा अस्पष्ट, संदिग्ध, प्रवाही आणि आत्मनिष्ठ स्वरूपाचा असतो. व्यक्तिगत प्रतिसादावर तो बऱ्याच अंशी अवलंबून असतो. पण ह्यातूनच भाषांतराचे, विशेषतः साहित्य-भाषांतराचे, बरेच प्रश्न पुढे येतात. भाषांतरसमस्येतील खऱ्या दुखण्याचे मूळ इथे आहे.

## ८. भाषांतर– क्षमतेच्या कक्षा

मूळभाषेतील साहित्यकृतीचा वाचक आणि ग्राहकभाषेतील तिच्या भाषांतरित आवृत्तीचा वाचक ह्यांच्या प्रतिसादात फार मोठी नसली, तरी दुर्लक्षिता न येण्याजोगी तफावत पडत असते. ह्याची दोन कारणे संभवतात : ( १ ) प्रत्यक्षानुभूतीच्या पातळीवर दोन भाषांमध्ये एकाच अनुभवाचा वेगवेगळ्या पद्धतींनी भाषिक आविष्कार होत असतो. आणि ( २ ) सांस्कृतिक दुराव्यामुळे दोन्ही कृतींच्या आशयाविष्कारात कमी-जास्त फरक पडत जातो. मूळभाषेतील साहित्यकृती आणि ग्राहकभाषेतील तिची भाषांतरित आवृत्ती ह्या दोहोंत आशयातील समानता, सारखेपणा बऱ्याच मोठ्या प्रमाणात आढळतात, तशीच तफावतही

कमी–जास्त प्रमाणात दिसून येते. म्हणून त्या दोहोंतील संबंध एकरूपी नाहीत, तर समरूपी असतात असे म्हणता येईल. तसेच अशा प्रकारच्या अभ्यासातून 'भाषांतर-क्षमतेच्या कक्षा' आपोआप लक्षात येऊ शकतात.

## ८.१. पद्याचे भाषांतर

साहित्य-भाषांतरातील बरेचसे प्रश्न प्रामुख्याने साहित्यभाषेच्या अनेकार्थ सूचन-शक्तीमुळे निर्माण होतात. कवितेत, विशेषतः भावकवितेत, ही शक्ती फार मोठ्या प्रमाणात आढळते· म्हणून सर्व साहित्य-प्रकारांत कवितेचे भाषांतर जास्तीत जास्त अवघड असते. काव्याच्या ठिकाणी स्वतःकडे आकृष्ट करण्याचा एक गुण आढळतो. अमेरिकन नवसमीक्षक रॅन्सम त्यास 'चमत्कृतिभाव'[९] (miraculism) म्हणतो. शैली-विचारात ह्या लेखनक्लृप्तीस प्रा. भालचंद्र नेमाड्यांनी योजिलेल्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, 'पुरोभूमिकरण'[१०] (foregrounding) म्हणतात. काव्यभाषा रूपात्मक आणि आवाहक असते. नावीन्य आणि ताजेपणा हे परिणाम साध्य करण्याकडे तिचा कल असतो. कवी वा लेखक ज्या युक्ती योजून 'पुरोभूमिकरण' सिद्ध करतो. त्या ह्या : (१) पुनरावृत्ती (२) जोर, (३) अनपेक्षित, असहचरी शब्दबंध आणि (४) अन्वयसापेक्ष, चमत्कृतियुक्त वाक्य-रचना, किंवा अशासारख्या असतात.

### ८.१.१. स्वरपातळीवर भाषांतर

स्वराच्या पातळीवर भाषांतर-प्रक्रियेत काय होते, हे आपणांस आता पाहावयाचे आहे. त्यातही कविता आणि कवितेतर साहित्यप्रकारात कसा फरक पडत जातो, हे आता आपण समजून घेऊ.

कवितेचे माध्यम शब्द असले, तरी स्वराला तिच्या रचनेत असाधारण महत्त्व प्राप्त झालेले असते. स्वराबरोबर लयही येते. म्हणून भाषांतरकाराला मूलभाषेतील कविता ग्राहकभाषेत भाषांतरित करताना आशयाविष्काराप्रमाणे तिच्या स्वर-लय-रचनेकडेही लक्ष द्यावे लागते. ह्याशिवाय छंद, यती, यमक, ओळ-अखेर, इतकेच नव्हे, तर विरामचिन्हेही कवितारचनेत आणि तिच्या भाषांतरात महत्त्वपूर्ण ठरतात. पण मूलभाषेतील रचना ग्राहक-भाषेत जशीच्या तशी आणू पाहणे हे जवळपास मृगजळामागे धावण्यासारखे होते, हे भाषांतरकाराला स्वानुभवाने माहीत असते. म्हणून त्याचे मुख्य लक्ष 'आशयाची समानता' साधणे असते. हा आशय अनुभूतीच्या पातळीवर पकडून तो त्यास, कधी सममूल्यकांचा आश्रय घेऊन तर कधी त्यांच्याशिवाय ग्राहकभाषेत शब्दरूप बहाल करण्याचा कमी–जास्त यशस्वी प्रयत्न करताना दिसतो. भाषाशास्त्रदृष्ट्या दोन भाषात 'समानके' (synonyms) फारच क्वचित आढळत असल्यामुळे भाषांतरकारास 'सममूल्यांका'वर (equivalents) किंवा त्यांच्याशी सामीप्य, सादृश्य साधणाऱ्या शब्दांवर विसंबून

'आशयाच्या समानते'चा शोध घ्यावा लागतो. तरीही मूळरचनेतील श्लेष, प्रतिध्वनि-सूचक शब्द, अनुप्रास, नादानुसारी शब्द व द्वित्व भाषांतरात जसेच्या तसे म्हणजे त्यांच्या वैशिष्ट्यांसह पकडणे अशक्य असते, असे म्हटले, तरी चालेल.

### ८.१.२. आशयपातळीवर भाषांतर

आशयाच्या दृष्टीने विचार करता, भाषांतरकाराला अन्य साहित्यप्रकारांच्या तुलनेने कवितेत असंख्य, गंभीर अडचणींना सामोरे जावे लागते. ज्यांच्यावर त्याला मात करता येत नाही, अशा अडचणींचे दोन प्रकार संभवतात : एक अत्यंत सोप्या अडचणी ( त्यांचा सोपेपणा आविष्करणासाठी अडचणीचा ठरतो ), आणि दोन, अत्यंत अवघड अडचणी (भाषिक, सांज्ञापनिक आणि सांस्कृतिक अडथळ्यांमुळे ह्या प्रकारच्या अडचणी उद्‌भवतात.) त्यामुळेच भाषांतरित कवितारचनेत कमी-जास्त प्रमाणात आशय सारखाच; पण त्याची बांधणी मात्र बरीचशी वेगळी हा प्रकार बहुधा पाहावयास मिळतो. मग भाषांतरकारावर हे ह्या कवितेचे भाषांतर आहे, असे सांगण्याची पाळीसुद्धा येते. पण कवितेचे, विशेषत: भावकवितेचे, प्रा. अशोक केळकरांच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, 'जवळून' भाषांतर करणे शक्य नसल्यामुळे 'दुरून' भाषांतर करण्याला अन्य पर्याय उरत नाही, हे आपण लक्षात घेतले पाहिजे. ह्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे तुकारामाच्या अभंगांचे भालचंद्र नेमाडेकृत किंवा मीराबाईच्या भजनांचे प्रीतीश नंदीकृत इंग्रजी भाषांतर.

कवीने स्वतःच किंवा ते शक्य नसल्यास इतरांच्या साह्याने आपल्या कवितेचे भाषांतर करणे उचित आणि जास्त श्रेयस्कर ठरते, कारण आशयाचा अवकाश त्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात नियंत्रित करता येतो. कवितेची अनेकार्थसूचकता आणि तिचे भाषिक रूपकात्म स्वरूप ह्या दोहोंतून उद्‌भवणाऱ्या बांधांवर कमी-जास्त उपाययोजना करता येते. उदाहरण म्हणून टागोरांचे '**गीतांजली**'चे किंवा विंदा करंदीकरांचे स्वतःच्या कवितांचे '**पोइम्ज़ अव विंदा**' आणि '**सम् मोअर पोइम्ज़ अव विंदा**' म्हणून केलेले इंग्रजी भाषांतर सांगता येईल.

## ८.२. गद्याचे भाषांतर

पद्याच्या भाषांतर-विचार केल्यानंतर आता आपण गद्य-भाषांतर-विचाराकडे वळू.

### ८.२.१. लयतत्त्व

स्वर-लयीची बांधणी पद्यात असते, तशी गद्यात असू शकत नाही. तरीही नाटकातील संवादांना लयीची गती असते. त्याचे कारण नाटकाचे दृक्‌श्राव्य स्वरूप म्हणता येईल. म्हणून तिचाही विचार भाषांतरकाराला करावा लागतो. पण कथा, कादंबरी आदी साहित्य प्रकारांत त्याला गद्य-लय वगळता स्वर-पातळीवर अन्य कशाचाही विचार करावा लागत

नाही. लयतत्त्व भाषापरत्वे बदलते असते. म्हणून भाषांतरात मूळभाषेतील लयीपेक्षा भिन्न अशी लय निर्माण होते. भाषेच्या ह्या स्वर-लय-रचनेच्या पातळीवर भाषांतर-क्षमतेच्या कक्षा, वेगवेगळ्या साहित्य-प्रकारांच्या संदर्भात, किती बदलत्या, किती संकोचून असतात हे अशा प्रकारच्या अभ्यासात पाहावयास मिळते. उदाहरणार्थ, विंदा करंदीकरकृत 'राजा लिअर' हे काव्यात्म नाटक.

परंतु साहित्य-भाषांतरकाराच्या समोरचा यक्षप्रश्न म्हणजे ग्राहकभाषेत मूळभाषेतील संदर्भपरिपुष्ट, शैलीबद्ध आशय जेवढा जास्तीत जास्त पकडता येईल तेवढा पकडणे. ग्राहक-भाषेत सममूल्यकांचा शोध घेत मध्यवर्ती आशयाच्या आविष्काराप्रत पोहोचणे हे त्याचे प्राथमिक कर्तव्य ठरते. भाषांतरकाराच्या आवडीनिवडीचा गुणानुक्रम उतरत्या श्रेणीत असतो : पहिल्यांदा आशय, नंतर शब्द व वाक्यरचना, त्यानंतर शैलीविशेष आणि सरतेशेवटी, स्वर-प्रभाव.

## ८.२.२. आशयाची समानता

'आशयाची समानता' प्रस्थापित करण्यासाठी भाषांतरकार ग्राहकभाषेत यथायोग्य शब्दयोजन करीत असतो. हे प्रथम संकल्पनांच्या आणि नंतर अर्थसूचनांच्या पातळींवर घडत असते. मूळभाषेतील बोलभाषा-स्वरूपाचे शब्द आणि शब्दबंध ग्राहकभाषेत यथा-शक्य आणण्यास भाषांतरकार प्रतिबद्ध असतो, पण मधूनच शिष्ट, औपचारिक शब्द-वाक्य-प्रणाली घूसखोरी करीत असल्यामुळे कधीकधी त्याला हतबल व्हावे लागते. आशयाच्या पूर्ण लोपाचे संकट त्याला भेडसावते तेव्हा वाचिक-लिखित, अनौपचारिक-औपचारिक भाषिक स्तरांची सरमिसळ करण्याची तडजोड पत्करून होता होईल तेवढा आशय संभवनीय हानीपासून वाचवण्याचा तो आटोकाट प्रयत्न करतो. म्हणी, वाक्प्रचार, सहचरी/सहवर्ती शब्द, संबोधने, शापवाचक, आशीर्वादसूचक शब्द, निषेधवाचक शब्द, घोष-शब्द-वाक्य, अशिष्ट व ग्राम्य शब्दप्रयोग, आर्ष रूपे, 'भंकस' सदृश नित्यनूतन बोलभाषाशब्द, इत्यादींचे एका भाषेतून दुसऱ्या भाषेत भाषांतर करणे म्हणजे 'महाकष्ट'. म्हणून भाषांतरकारास मूळभाषेतील संदर्भ आणि शब्दसाहचर्य/सहवर्तित्व लक्षात घेऊनच साहित्यकृतीचे ग्राहकभाषेत भाषांतर करावे लागते. तद्वतच त्यास मूळभाषा आणि ग्राहक-भाषा ह्यांच्या वाक्यरचनेतील तोल आणि लय ही शैली-विचारांशी निगडित असलेली तत्त्वेही नजरेआड करून चालणार नाही. सर्जनशील लेखकास निवडीचे पूर्ण स्वातंत्र्य असते, तसे भाषांतरकारास असत नाही. मूळभाषेतील शब्द, त्या शब्दांतून अभिव्यक्त अनुभव आणि आशय हे सारे त्याच्यासाठी पूर्वनियत असतात. त्यांच्या पुनराविष्काराच्या तिहेरी खोड्यात तो पूर्णपणे अडकलेला असतो. मूळ लेखक आणि त्याची कृती ह्यांच्याशी तो बांधील असतो आणि ह्या बांधिलकीत त्यास स्वतःचे व्यक्तित्व विसर्जित करावे लागते. वि. वा. शिरवाडकरांच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास, त्याचे 'सामीलीकरण' होते.

भाषांतर करताना, ग्राहकभाषेत मूळभाषेतील, विशेषतः कादंबरीपेक्षा नाटकातील संवादांची दैनंदिन संभाषणरूपे वेगळीच रूपे घेतात. मूळभाषेशी निगडित किंवा तिच्या छायेत वावरणारे विनोद, उपरोध व उपहास कमी–जास्त अर्थहानीसह ग्राहकभाषेत अवतरतात. श्लेष किंवा प्रतिध्वनीच्या बाबतीत, तर ही अर्थहानी अटळच होते. तरी सर्वसाधारण शब्द, शब्दबंध, वाक्प्रचार इ. आशयानुसारी रूप स्वीकारताना दिसतात. ह्या प्रक्रियेत वाच्यार्थात कमी–जास्त बदल होत असेल, नसेल, पण आशयहानी मात्र क्वचितच होते. दोन भाषात बोधनाच्या पातळीवर कमी–जास्त समानार्थी शब्द बऱ्याच मोठ्या प्रमाणात असतात, तसे नसते, तर भाषांतर–प्रक्रिया अशक्य झाली असती. पण भाषिक संदर्भ प्राप्त झाल्यानंतर त्यातील बऱ्हंशी शब्दांना नवे अर्थ, नव्या अर्थच्छटा निर्माण होतात. म्हणून शब्दशः केलेले भाषांतर बहुधा हास्यास्पद ठरते. वाक्यगत शब्द केवळ संदर्भानुसारी अर्थ नाही, तर आशयही निर्माण करतो. म्हणून भाषांतरकार मूळभाषेतील साहित्यकृतीचा वाक्यांतर्गत वाच्यागत चंचल असणारा आशय पकडण्याच्या प्रयत्नात असतो. आशयाविष्कारासाठी त्याने उपयोजिलेले शब्द 'समानके' खऱ्या अर्थाने सममूल्यधारक शब्द नसतात, पण तसे असल्याचे मात्र गृहीत धरतात. म्हणून त्यांना मूळशब्दांची 'प्रवर्त रूपे' म्हणणेच जास्त उचित होईल.

## ८.२.३. भाषांतर : मूळ साहित्यकृतीचे प्रवर्तरूप

भाषांतर करताना ग्राहकभाषेत मूळभाषेतील-विशेषतः कादंबरीपेक्षा नाटकातील–संवादांतील बोलभाषा रूपे काही वेळा मोठ्या अडचणीचे होतात मूळभाषेशी निगडित किंवा तिच्या छायेत वावरणारे विनोद, उपरोध व उपहास कमी–अधिक अर्थहानी स्वीकारून ग्राहकभाषेत अवतरतात. तरी सर्वसाधारण शब्द, शब्दबंध आणि वाक्प्रचार त्यांची सममूल्यके भाषाभाषांत सापडतात. ह्या सममूल्यकांत संदर्भसूचित अर्थाची म्हणजेच आशयाची समानता गृहीतच असते. सममूल्यकांच्या उपयोजनातून सिद्ध होणारी 'आशयाची समानता' सापेक्ष असते, कधीच पूर्ण नसते. म्हणून भाषांतरित कृती मूळ साहित्यकृतीचे प्रवर्तरूप असते असे म्हटले, तर वावगे ठरू नये.

### संदर्भ :


१. वसंत बापट : तौलनिक साहित्याभ्यास, ( मुंबई : मौज, १९८१ ), पृ. ५०.

2 N. Enkvist et al : Linguistics ane style, (London : O U. P. 1964), pp. 85–91.

3. R. Wellek & A. Warren : Theory of Literature, [Harmondsworth : penguin, 1962 ] pp. 22-25.


[पुढील मजकूर पान ५७ वर पाहा.]





अनुक्रमणिका

# अशी रूपे कशी बरे आली होती असतील ?

विश्वनाथ खैरे

' भाषा आणि जीवन ' ( अंक ९ : १ ) मधल्या शंका आणि समाधान ' या सदरातील शंका आणि तिच्या समाधानाच्या संदर्भात—

१ ) अशी रूपे कशी बरे आली असतील ?

हा प्रश्न बरोबर आहे का ? ती आहेत, हे निदर्शनास आल्यावर त्यांची व्यवस्था लावणारे व्याकरण सिद्ध करणे हे खरे भाषा–अभ्यासकाचे काम आहे. प्रमाण मराठीला पायाधार धरून ' अशी ' रूपे असला प्रयोग होतो–हे अयोग्य वाटते.

२ ) ही रूपे मराठीच्या बोलीतील आहेत का ?

सुनीताबाईंच्या लेखनात (आणि त्यांच्या व पुलंच्या साक्षीनुसार, बोलण्यातही ती आहेत म्हणजे बोलीतील आहेतच. कोकणातल्या रत्नागिरी जिल्ह्यातल्या शेतकरी घराण्याच्या तीन पिढ्या मुंबईत गेल्यावरच्या पिढीतल्या माझ्याही पत्नीच्या तोंडून ही रूपे मी ऐकली आहेत. ( म्हणूनच खुद्द रत्नागिरीतल्या बोलीचा शोध न घेता कुडाळी-मालवणीकडे ग्रिअर्सनमार्गे धावणे ही नेटिव्ह गुप्त पोलिशीच झाली ! )

३ ) ग्रंथबद्ध प्रमाण मराठीत ती आढळतात का ?

१ ) या विवेचनात याचे थोडे विवेचन आहे. प्रमाण मराठी ही पुण्या-मुंबईच्या शिष्टसमाजाची भाषा असल्यामुळे संकुचितच आहे. सरोजिनी बाबर यांच्या ' गेलावता, आम्ही आलेले ' असल्या सातारी रूपांची कुठे कुणी दखल घेतली ?

४ ) दुसरे पद वगळल्याने अर्थहानी.

होती असेल–यातले दुसरे पद ' असेल ' हे वगळल्याने निश्चितच अर्थहानी ' होत असणार '. ' होती ' हे दुसरे पद असे कदाचित तुमच्या मनात ' होते असेल ', तर ते वगळल्याने तथाकथित प्रमाण मराठी वाक्य होईल आणि काही हानी झाली असे प्रमाण-भाषकांना वाटणार नाही, तरी सुनीताबाईंची बोली बोलणारांना नक्कीच तसे वाटेल.

५ ) लेखिकेला अभिप्रेत अर्थ व्यक्त करण्याचा प्रमाण मराठीतला पर्याय ' जोड-क्रियापदातले पहिले पद ( होती... ) गाळणे हाच एक दिसतो. प्रमाण मराठी एकच पर्याय प्रमाण धरणार ना ?

६ ) एका वाचकाचा प्रकाश = तो आला असेल-यात तो आला, हा भूतकाळी वाक्यबंध आहे आणि तो येणार असेल-यात तो येणार हा भविष्यकाळी वाक्यबंध आहे





अनुक्रमणिका

तसाच ती होती असेल, यात ती होती हा भूतकाळी वाक्यबंध आहे आणि 'आला'च्या अनुकृतीने 'होती' हे भूतकाळी क्रियापद त्यात आले. त्याच अनुकृतीने 'ती होणार असेल' यात भविष्यकाळी 'होणार' पद आले. 'असे' 'नव्हे असेल' 'निदान असेल' अशी पदरची पदे अध्याहृत म्हणून घालण्याची गरज वाटत नाही. अनुकृतीनेच 'कौतुकच केले होते असेल' हे 'पूर्णभूतकाळी' आणि 'मिसळत होती असेल' हे 'चालू भूत-काळी' पद सिद्ध 'झाले होते असावे.'

३७४ सिंध हाउसिंग सोसायटी, पुणे ४११००७.

## परांजप्यांनू, मी सांगतय् तुमका ती रूपां कशी येतत, तां...

### अंजनी खेर

सिंधुदुर्ग जिल्ह्यातल्या एका तालुक्याच्या गावी मी पाचवी ते अकरावी अशी माध्यमिक शाळेची सर्व वर्षे राहिले आहे. प्रत्येक भारतीय माणसाला एक जात असते आणि तिचा संदर्भ चुकवून काही जगता येत नाही, याची चरचरीत जाणीव मला ह्या गावी आल्यावर लगेचच झाली. तिथे बहुसंख्येने असणाऱ्या समाजापेक्षा माझी जात वेगळी होती. माझ्या कातडीच्या आणि डोळ्यांच्या वर्णावरून, तसंच बोलण्यावरून ते त्यांना लगेच कळत असे. त्या समाजाने आम्ही तिथे उपरे आहोत ही टोचणी शेवटपर्यंत दिली. त्याच्या आधी आम्ही खानदेशातल्या एका जिल्ह्याच्या गावी होतो. तिथेही आम्ही प. महाराष्ट्रातून उठून गेलो होतो. पण तिथे उपरेपणाची भावना कधी आली नाही. कारण भाषा फार वेगळी—निदान शहरात तरी-नव्हती; किंवा माझं वय फार लहान होतं, हे कारण असेल.

ह्या गावात सर्व लोकसंख्येची वर्गवारी एक तर मासेखाऊ किंवा मासे न खाणारी 'भटां' अशा दोनच प्रकारांत होत असल्याचं लक्षात आलं. मासे खायला सुरुवात करणं काही माझ्या हातांत नव्हतं. पण खेळगड्यांनी मला स्वीकारावं, म्हणून मी फारच लवकर मालवणी बोलायला शिकले. सुरुवातीला घरात किंचित् नाकं मुरडली गेली, तरी हिरिरीने बोलत राहिले. पुढे कॉलेजसाठी पुण्याला आल्यावर आपण भट म्हणजे खरं तर कोकणस्थ ब्राह्मण आहोत आणि शिवाय कऱ्हाडे, देशस्थ वगैरे ब्राह्मणांच्या अन्य पोट-जातीही असतात हे ज्ञान झालं.

शाळेच्या पहिल्या दिवशी मी माझं नाव सांगितल्याबरोबर 'मंजे भटा!' अशी कुजबुज झाली. शिक्षकांनी तसं उघडपणेच म्हणून टाकलं. इतर इयत्तांमधल्या कोणी ओळख करून घेण्याची उत्सुकता दाखवलीच, तर नाव सांगितल्याबरोबर 'मंजे भटा गो तुमी ?', असा प्रतिप्रश्न ठरलेला असायचा. वर्गात तीस-पस्तीस मुलगे आणि चार किंवा पाच मुली.

मुलगे आणि मुली एकमेकांशी अजिबात बोलत नसत. म्हणजे मैत्रीण मिळण्याची संख्या-शास्त्रीय शक्यता एकदमच मर्यादित. यामुळे मी त्यांच्यांत सामावून जाण्यासाठी घेतलेले भाषाविषयक परिश्रम मला चांगलेच आठवतात.

नंतरच्या वर्षी आमची धामापूरला मोठी सहल गेली होती, ह्यावर्षीही गेली होती; पण आपली तरीपलीकडे पाच-सहा मैलांवर असलेल्या देवळात. धामापूरला आम्ही स्पेशल एस्टी करून गेलो होतो. शाळेचं आणि गावाचं नाव राखण्यासाठी जबाबदारी होती. दोन दोनच्या कतारींत आम्ही तळ्यापासून गावात मध्यवर्ती ठिकाणी असणाऱ्या देवळात चाललो होतो. गावकरी थोडंसं कौतुकाने आमच्याकडे बघत होते. मी शेजारच्या मुलीशी माझ्या कमावलेल्या मालवणीत गप्पा मारत चालले होते. एवढ्यात हाताला करकचून चिमटा बसला. 'गो अंजग्या, भाषा बोल!' असं राणी म्हणाली. (मालवणीत कुठलंही माणसाचं नाव सरळ घेता येत नाही. राणीचं कागदोपत्री नाव प्रेमा होतं. मालवणीत पेमली. त्याचं सामान्यरूप पेमला, संबोधन पेमल्या गोंऽवगैरे!)

"भाषा मंजे? काय बोलतंसंय् मी?"

"मंजे मालवणी नुको गो! लोकां बघतंत. शुध बोल."

'भाषा बोला' हा पेमलीचा हुकूम मानून सगळ्या प्रयासाने 'शुध' बोलायला लागल्या. त्यात ही सुनीताबाईंनी वापरलेली रूपे येऊ लागली. मी ती दुरुस्त करायचा प्रयत्न केला, पण प्रमाणभाषेची रूपे पेमलीला जमत नसत. त्यामुळं माझं शुद्ध हे शुध नसून मी त्यांच्या-सारखं शुध बोलावं असं ठरलं. आमचे शिक्षकही– जे मालवणीच होते,– असंच 'शुध' बोलत. देशावरून आलेले असल्या 'शुध' रूपांना आक्षेप घेत नसत. घरी आई मात्र माझ्या अशा प्रकारच्या 'शुध'ला 'काय ग, हा हेंगाडेपणा?' असं फटकारायची– तेव्हा तिच्याशी बोलताना पुणेरी शुद्ध आणि वर्गात मालवणी शुध असा दुटप्पीपणाही मी लवकरच शिकले.

तर ही राणी म्हणजे शिक्षकांनी न नेमलेली मॉनिटर. ती राणीपदाला कशी पोचायची, ते मला कळलं नाही. 'ह्या वर्षी तुमच्या वर्गाची राणी कोण अशी चौकशी व्हायची. म्हणजे ही स्थिरावलेली अन् सर्वमान्य संस्था होती. नाइलाजानं का होईना ह्या अनभिषिक्त राणीच्या राज्यात रहायचं असल्याने शुध म्हणजे ती सांगेल ते, माझं बिचारं पुणेरी शुद्ध नव्हे, हा हुकूम मानून मी सुद्धा 'असंच बोलले होते असेन.' (ह्यातली अनिश्चितता बोलण्याकडे न घेता कारणाकडे घ्यावी.) ह्या राणीसाठी घरून आपल्या खाऊतला वाटा, पिना, बांगड्या वगैरे चांगल्या चुंगल्या वस्तूंची खंडणी आणावी लागे. आठवी–नववीच्या सुमारास हा प्रकार संपल्याचं आठवतं.

प्रमाणभाषेला शुद्ध हा शब्द न लावता, नुसतं भाषा म्हणणे हा प्रयोग माझ्या विशेष करून लक्षात राहिलेला आहे. हल्ली इंग्लिश वृत्तपत्रातून regional म्हणजे प्रादेशिक हे विशेषण गाळून नुसतं the language press (प्रादेशिक भाषेतली वृत्तपत्रसृष्टी)

असं म्हणतात त्याची आठवण येते. संस्कृतज्ञांना पाणिनीच्या ' भाषायाम् ' ( वेदांत नव्हे, साध्या संस्कृतमधे ) या शब्दप्रयोगाची आठवण व्हावी.

सांगायचा मुद्दा असा, की अस्सल मालवणीत ही रूपे येगारच नाहीत. मालवण्ये जेव्हा शुध बोलतात तेव्हा तुम्ही म्हटल्याप्रमाणे भूतकाळातील अनिश्चितार्थ, संभाव्यता वगैरे व्यक्त करताना ही रूपं वापरतात. एकापेक्षा खूपच जास्त पदांची Verb phrase न झेपण्याचा तो प्रकार आहे. बऱ्याच विद्यार्थ्यांना जर्मनमधला subjunctive mood अशाच प्रकारे कठीण जातो हा माझा भाषा-शिक्षक म्हणूनही अनुभव आहे.

जर्मन विभाग, फर्गसन महाविद्यालय, पुणे ४११००४.

पूर्वसंदर्भ : प्र. ना. परांजपे, ' अशी क्रियापदांची रूपे कशी बरी आली होती असतील ?' भाषा आणि जीवन ९:१:२४-५, हिवाळा १९९१.

परांजप्यांच्या पत्राच्या संदर्भात हिवाळा १९९१ अंकातच शंकेचे समाधान म्हणून भाषा-वैज्ञानिक पद्धतीची एक तर्कपरंपरा मांडली होती. मध्यंतरी डॉ. कल्याण काळ्यांना एका मालवणी व्यक्तीच्या ' मराठी 'मध्ये हे प्रयोग सापडले होते. श्रीमती अंजनी खेर यांच्या पत्राने याला दुजोरा मिळत आहे. हे प्रयोग ' मराठी 'त नाहीत, ' कुडाळी 'त नाहीत ( मालवणी ही कुडाळीची एक उपबोली ), पण ' कुडाळी ' वळणाच्या ' मराठी 'त बऱ्या-पैकी रूढ असावेत. जेव्हा काळ आणि अभिवृत्ती ( मूड ) एकत्र येतात, तेव्हा अभिवृत्ती सहायक क्रियापदाचा ताबा घेते आणि काळ हा थोडा कोपऱ्यात ढकलला जातो.

| | |
|---|---|
| speaks बोलतो | spoke बोलला |
| must surely speak | must surely have spoken |
| नक्कीच बोलत असला पाहिजे | नक्कीच बोलला असला पाहिजे |
| ...... | (नक्कीच बोलला पाहिजे होता ) |
| नक्कीच बोलत असेल | नक्कीच बोलला असेल |
| | [ नक्कीच बोलला होता असेल. ] |

कंस कोष्ठकातले ' मराठी ' वाक्य आणि चौकोनी कोष्ठकांतले ' कुडाळी-वळणाचे मराठी ' वाक्य या साच्यात बसत नाहीत. या दोन्ही कोष्ठकांतील वाक्यांत काळ आणि अभिवृत्ती यांना सारखेच महत्त्व देण्याचा आग्रह दिसतो.

श्रीमती अंजनी खेरांच्या पत्रात या सर्व प्रश्नाची सामाजिक आणि सांस्कृतिक बाजू चांगल्या रीतीने प्रकट झाली आहे. हलव्याची तुष्टिदायक साखर तोंडात विरघळली, की तोंडात पुष्टिदायक तीळ उरावा, तशी. इतक्या चांगल्या रीतीने, की त्यावर तिचे तर्ककर्कश विश्लेषण करण्याची गरज पडू नये.

अशोक रा. केळकर





अनुक्रमणिका

## लिहिण्यापेक्षा वाचायला शिकवा

**नीळकंठ रथ**

आपल्या पत्रिकेच्या ८:४ ( दिवाळी १९९० ) या अंकातील आशा मुंडले यांचं संपादकीय मी आवडीनं वाचलं. प्रौढांना लिहिण्यापेक्षा वाचायला शिकवावं, असं प्रतिपादन त्या करतात, ते योग्यच म्हटलं पाहिजे. पण त्यांचं हे विधायक प्रतिपादन एका छोट्या परिच्छेदापुरतंच मर्यादित राहिलं आहे. त्यांच्या संपादकीयाचा बराचसा भाग हा प्रौढांना लिहायला शिकवताना येणाऱ्या अडचणींचा पाढा वाचण्यातच खर्ची पडला आहे.

लिहायला शिकण्यापेक्षा वाचायला शिकणं अधिक सोपं आहे, असं मलाही वाटतं. माझा या बाबतीतला अनुभव मी, माझी आई आणि माझ्या काकू यांच्याशी संबंधित आहे. आमची मातृभाषा बंगाली नाही, किंवा आम्ही कधी बंगालमध्ये राहिलोही नाही. पण आम्ही तिघंही मुद्रित स्वरूपातील बंगाली वाचू शकतो. मी बंगाली वाचायला कसं शिकलो, हे मला योगायोगानं माहीत आहे. मी माध्यमिक शाळेत असताना (आणि त्यामुळे आशा मुंडले ह्यांच्या व्याख्येप्रमाणे तसा प्रौढच) उन्हाळ्याच्या सुट्टीत मी माझ्या आई-जवळ लोळत पडलेला असायचो. त्या वेळी ती काशीराम दास यांचं बंगालीत पद्यबद्ध केलेलं महाभारत वाचत असायची. तिच्या त्या पुस्तकातील छापलेल्या ओळी पाहत मी ते ऐकत असायचो. आणि अशा रीतीने निरीक्षणाने, श्रवणाने आणि अनुकरणाने मी बंगाली वाचायला शिकलो. अर्थात मी मुद्रित बंगाली वाचायलासुद्धा शिकतो आहे, हे मला त्या वेळी माहीत नव्हतं. याचा परिणाम असा झाला, की मला बंगाली चांगलंच वाचता येत असलं, तरी बंगाली मुळाक्षरं मात्र मला केवळ स्मरणानं काढता येत नाहीत. बंगाली आकडेसुद्धा मला चांगले वाचता येत नाहीत, कारण माझ्या आईला वाचताना पानांचे क्रमांक वाचायची गरज वाटत नसे आणि त्यामुळे ते क्रमांक ओळखण्याची मला संधीच मिळाली नाही. माझ्या माहितीप्रमाणे माझी आई आणि माझ्या काकू याही अशाच प्रकारे बंगाली वाचायला शिकल्या. त्यांनासुद्धा एकही बंगाली अक्षर मनानं काढता येत नाही.

सर्वसामान्य पुरुषाला आणि स्त्रियांना स्वतःची मातृभाषा नसलेल्या भाषेतील मुद्रित शब्द अशा प्रकारच्या दृक्श्राव्य पद्धतीनं वाचायला यायला लागले. हे जर शक्य असेल, तर मला वाटतं, की कोणत्याही प्रौढ व्यक्तीला आपल्या मातृभाषेतील मजकूर वाचायला शिकणं अधिक सोपं जाईल.

कोणत्याही प्रौढ व्यक्तीला पुराणं अथवा कथा, वर्तमानपत्र अथवा त्याच्या आवडीचा कोणताही छापील मजकूर तसंच जे वाचणं आवश्यक आहे, ज्यांची माहिती घेणं आवश्यक आहे, अशा कार्यालयीन सूचना, परिपत्रकं, भित्तिचित्रं इ. वाचायला समर्थ बनवणं हाच

प्रौढ साक्षरता मोहिमेचा प्रमुख उद्देश आहे अथवा असावा. हातानं लिहिलेला मजकूर वाचायला येणं हा अर्थात थोड्या सरावाचा भाग आहे.

शिक्षणार्थ्याला बाराखडी लिहिता आली आणि स्वतःचं नाव लिहिता आलं, की आपली प्रौढ साक्षरता मोहीम यशस्वी झाली, असं मानण्यात येतं. जनगणनेच्या तत्त्वांनुसार साक्षरतेची ही साधी चाचणी आहे. या वेळी आपण हे विसरता कामा नये, की ग्रामीण भागातील बऱ्याच लोकांना आपल्या संपूर्ण आयुष्यात पत्र लिहिण्याची एकदासुद्धा वेळ येत नाही. त्यामुळे अशा परिस्थितीत परत निरक्षरतेची अवस्था येणं म्हणजेच लिहिण्याची क्षमता न राहणं हे अटळ आहे, हे सहज लक्षात येण्यासारखं आहे. पण वाचनक्षमता नाहीशी होण्याची शक्यता त्या मानाने कमी आहे. त्यामुळे शिकण्या–शिकवण्याच्या सुलभतेच्या दृष्टीने आणि टिकाऊ उपयुक्ततेच्या दृष्टीने निरक्षर प्रौढांना वाचननैपुण्य शिकवणं हे इष्ट ठरेल.

अर्थात एकंदर शिक्षण-प्रक्रियेमध्ये लेखन हे कमी महत्त्वाचं आहे, असा त्याचा अर्थ होत नाही. नाहीतरी ' लेखन माणसाला परिपूर्ण बनवतं ' ( बेकन ) असं म्हटलंच आहे. एखादी गोष्ट करायची, तर ती सर्वोत्तमच करायची, नाहीतर काहीच करायचं नाही, असा दुर्दैवानं आपल्या लोकांचा समज दिसतो. परिणामतः बहुधा दुसरा पर्यायच पत्करण्याची आपल्याला पाळी येते. पण अत्युत्तम हे बऱ्याचा शत्रू ठरू नये एवढीच इच्छा.

१६–१९/५, पटवर्धन बाग, एरंडवणे, पुणे ४११००४.

## पुन्हा एकदा ' साउलें '

### लीला अर्जुनवाडकर

हालाच्या गाहासत्तसईमध्ये ' साउली ' हा शब्द दोनदा आला आहे. क्रमांक २६९ व ६०५ (जोगळेकर आवृत्ती) या गाथांमध्ये. २६९ क्रमांकाच्या गाथेमध्ये ' साउलीअ' असे तृतीयांत रूप आलेले असून जोगळेकरांनी ' साहुली ' आणि ' साकुलीअ ' असे दोन पाटभेद तळटीपेत नोंदविले आहेत. ६०५ क्रमांकाच्या गाथेत ' साउली ' हे पद ' वाउव्वेल्लिअसाउलि ' अशा सामासिक रूपात व संबोधन म्हणून आले आहे. दोन्ही ठिकाणी संदर्भ स्त्रीच्याच वस्त्राचा असून जोगळेकरांनी त्याचे अर्थ ' पदर ' (गाथा क्र. २६९ ) व ' लुगडे ' ( गाथा क्र. ६०५ ) असे केले आहेत.

' शेफालिका ' या राजा बढे यांनी केलेल्या गाहासत्तसईच्या स्वैर अनुवादात प्रथम ' पदर ' व नंतर ' वसन ' असे शब्द वापरले आहेत. अरविंद मंगरूळकर यांनी याच पुस्तकात केलेल्या गद्यानुवादात मात्र प्रथम ' सावली ' व नंतर ' अंचलवस्त्र ' असे शब्द वापरले आहेत. यातला ' सावली ' हा शब्द ध्वनिदृष्ट्या ' साउले 'शी जुळणारा असला, तरी अर्थतः तो जुळत नाही. पदर/लुगडे हाच अर्थ अधिक योग्य आहे.

संदर्भ : ' देशीकार लेणे ' : ' निंबार ', ' साउलें '. भाषा आणि जीवन : वर्ष ८ : अंक १ : हिवाळा १९९०.

११९२, शुक्रवार पेठ, पुणे ४११००२.

# आत्मलक्षी समीक्षा–शैलीवैज्ञानिक चिकित्सेचे तंत्र आणि मंत्र

शैलेश सदाशिव पुंडलिक

**आत्मलक्षी समीक्षा** - (१९९१) डॉ. र. वा. धोंगडे, दिलीपराज प्रकाशन, पुणे. पृष्ठसंख्या १७९, किंमत रु. ८५ फक्त.

## भाग पहिला

**आत्मलक्षी समीक्षा** हे डॉ. र. वा. धोंगड्यांचे शैलीविज्ञानावरील दुसरे पुस्तक आहे. यापूर्वीच्या 'मराठी भाषा आणि शैली' (१९८५, दिलीपराज प्रकाशन, पुणे) या पुस्तकात त्यांनी शैलीविज्ञानातील विविध तत्त्वांचा उपयोग एकूणच ललित साहित्यविचारात कसा करता येतो, याची चर्चा केलेली होती. त्यानुसार त्यांनी **आत्मलक्षी समीक्षेत** कादंबरी नाटक, काव्य, आत्मचरित्र, लघुकथा वगैरे अनेकविध वाङ्मयीन आकृतिबंधांची शैली-वैज्ञानिक चर्चा सादर केलेली आहे. त्यामुळे शैलीविज्ञानिक फक्त काव्याचाच आणि तोही एका ठोकळेबाज पद्धतीनेच अभ्यास करतात, असा गैरसमज कुठे निर्माण होत असेल, तर त्याला परस्परच चपखल उत्तर मिळालेले आहे, असे म्हणायला हरकत नाही.

सकृद्दर्शनी धोंगड्यांच्या या पुस्तकाचे तीन भाग करावेसे वाटतात. त्यांतील पहिल्यात काव्याच्या अभ्यासात रामदास, इंदिरा संत आणि मर्ढेकर यांच्या काव्याबरोबरच गडकऱ्यांची काव्यसदृश असणारी काव्ये येतील. दुसऱ्या विभागात कथा आणि कादंबरीच्या अभ्यासात जी. एं.च्या कथा आणि तुंबाडचे खोत ही कादंबरी येईल, तर भाषाविचार आणि समाजविचार यांच्या अभ्यासात श्री. म. माटे यांच्यावरील लेख, दलित वाङ्मय आणि विशेषतः 'उचल्या' यांचा समावेश होईल. धोंगडे यांच्या लिखाणातील विषयांची विविधता लक्षणीय आहे. त्यामुळे त्यांचे विषय आणि निष्कर्ष यांचा थोडक्यात सारभूत गोषवारा देणे हे अतिशय अवघड आहे. त्यांचा थोडक्यात निर्देश करण्यामुळे लेखकावर अन्याय होणे स्वाभाविक आहे. पण सध्याच्या परिस्थितीत त्याला फारसा काही पर्याय आहे, असे दिसत नाही.

रामदासांवरील लेखामध्ये धोंगड्यांनी रामदासांच्या भाषेचे विश्लेषण करताना त्यातील यादीसदृश पद्ये, व्यवहारज्ञान / अध्यात्मज्ञान शिकवण्याची ईप्सा वगैरेंचा आढावा घेतलेला

आहे. त्यामुळे सौंदर्यनिर्मितीला बाध येत असल्याने रामदासांचे काव्य हे काव्य नसून पद्यात्मक रचना आहे, असा त्यांचा निष्कर्ष आहे. तर इंदिरा संतांच्या काव्यातील रंग-विशेषणांची चर्चा करताना त्यांच्या अनुभवविश्वाची मर्यादितता आणि अर्थवेधातील कमतरता ( paucity of meaning ) यांमुळे इंदिरा संतांच्या कविता ' अर्थाच्या बाळ-बोधपणे मार खातात ' ( पृ. २३ ) असे त्यांना वाटते. मर्ढेकरांवरच्या लेखाचा सारांश देणे शक्यच नाही म्हणून जिज्ञासू वाचकांनी तो मुळातूनच वाचायला हवा. कारण त्यात अनेक विषय, अनेक तत्त्वे, आणि निष्कर्ष एकमेकांत गुंतलेले आहेत.

गडकऱ्यांच्या नाटकांपैकी प्रेमसंन्यास, भावबंधन आणि एकच प्याला यांचा विचार मांडताना धोंगड्यांनी अनुक्रमे नाट्यवस्तूची संरचना, वैधर्म्याची समांतर रचना आणि नाट्य-रचनेची स्थितिलक्षिता या तीन निकषांचा वापर केलेला आहे. मग प्रेमसंन्यासातील विषयात येणाऱ्या लग्नसंबंध, विधवांचा प्रश्न आणि तत्कालीन समाजाची दृष्टी या घटकांची फक्त वरवरची, उथळ शाब्दिक मांडणी करण्यातच गडकरी यशस्वी झालेले आहेत. त्यांना या विषयांचा स्वयंप्रज्ञ विचार करता येत नाही (किंवा करायचा नाही), हे दाखवण्यात धोंगडे यशस्वी झालेले आहेत. त्याचप्रमाणे वैधर्म्याची समांतर रचना करायचीच असेल, तर त्याची जात अधिक सूक्ष्म करणे, वैधर्म्याचे स्तर वेगळे करून नाट्योपहासासारखे (irony) प्रभावी तंत्र वापरणे हे सुद्धा गडकऱ्यांना जमलेले नाही. आणि तीन अंकांपर्यंत गतिमान असणारे एकच प्याला नंतर ' दारू ' विषयाची चर्चा, सिंधु-सुधाकरांचे अद्वितीय वैवाहिक जीवन यांच्यात रुतून बसल्यासारखे होते. परिणामतः ही तीनही नाटके खऱ्या अर्थाने नाट्यात्म होऊ शकत नाहीत, असे या लेखांचे एकूण सूत्र आहे.

दुसरीकडे धोंगडे, माटे आणि माने यांचे भाषा आणि समाजविचार यांचे परीक्षण करताना असे स्पष्ट करतात, की दलित नाटकात शोकांतिका नाहीत, कारण त्या काव्यात कारुण्य असले, तरी अलिप्त चिंतनवृत्ती नाही. त्यामुळे प्रस्थापित समाजरचनेबद्दलची चीड हे सूत्र एखाद्या प्रसंगानंतर येते, तेव्हा ते त्या कादंबरीचा अविभाज्य घटक बनते, पण तेच जेव्हा गृहीत कृत्य म्हणून येते, तेव्हा ते प्रचारकी थाटाचे आणि कमअस्सल होते.

शेवटच्या विभागात धोंगड्यांनी जी. एं.च्या उपमा रूपकांतील मर्यादित अर्थक्षेत्रांची आणि त्यांच्या वास्तवनिर्मितीच्या आवाक्याची सीमितता यांची सांगड घातलेली आहे. त्यामुळे जी. एं.ची रूपके नवीन वास्तव निर्माण करू शकत नाहीत. तर त्यांची चांगली कथाच ते कार्य करते, असे त्यांचे म्हणणे आहे. आणि मृत्यू हे प्रतीक मानले, तर पेंडशांच्या लिखाणात भावनोत्कटता नाही, तसेच विविध विचारधारांवर आधारलेला बौद्धिक दृष्टिकोणही नाही. त्यामुळे मृत्यूला ' विविध अंगांनी भिडू न शकणारा ' हा लेखक काही मूलभूत सिद्धांतन करताना आढळत नाही, असे धोंगड्यांना वाटते.

या त्रोटक सारांशावरूनसुद्धा धोंगड्यांनी वापरलेल्या विषयांतील, पद्धतींतील, विविध तत्त्वांच्या उपयोजनातील आणि विविध उपपत्त्यांच्या चर्चेतील वैविध्य वाचकांच्या लक्षात

येईल. प्रश्न एवढाच आहे, की या आधारावर त्यांच्या लिखाणाचे मूल्यमापन कसे करता येईल.

### भाग दुसरा

आत्मलक्षी समीक्षा हे पुस्तक वाचताना धोंगड्यांच्या नावे अनेक श्रेये credits ) जमा करता येतील. अगदी काव्यरचनेचा विचार करताना सुद्धा त्यांनी रामदासांची पुनरुक्ती, त्यांच्या याद्या, तपशिलवार नोंदी, तर इंदिरा संतांच्या काव्यातील रंगविशेषणांची उत्तरोत्तर घटत जाणारी संख्या, त्यांचे स्वरूप आणि त्यांची मर्यादित आशयघनता; आणि मर्ढेकरांच्या कवितेत शैली म्हणजे विशिष्ट पर्यायाची निवड, नियमोल्लंघन वगैरेंसारख्या विविध काव्य-तत्त्वांनी–किंवा rather काव्यमूलतत्त्वांना अनुसरून चर्चा केलेली आहे. हीच वैचारिक लवचिकता त्यांनी गडकऱ्यांच्या नाटकाचे संरचनात्मक(structuralist) विवेचन करताना दाखवलेली आहे. त्यांच्या या वैचारिक लवचिकतेमुळे विषयाची विविध दालने उघडल्या-सारखी वाटतात, लिखाणात ताजेपणा कायम राहतो आणि आपण एक जिवंत, रसरशीत विषयाचा अभ्यास करीत आहोत याची खात्री पटते.

सखोल आणि पद्धतशीर अभ्यास हे धोंगड्यांचे दुसरे वैशिष्ट्य. इंदिरा संतांची रंग-विशेषणे असोत, मर्ढेकरांचे विविध प्रकारचे शब्द असोत वा जी. एं.च्या कथातील उपमा रूपके असोत, धोंगडे अगदी meticulouly त्यांची संख्या, त्यांची वर्गवारी, अर्थ विषयाशी असलेले त्यांचे संबंध यांचा अतिशय अथक आढावा घेतात. म्हणजे वाचताना वाचक थकेल, पण धोंगडे थकणार नाहीत. त्यामुळे आपल्या विधानांच्या सिद्धतेसाठी आवश्यक असणाऱ्या पुराव्याचा डोंगरच्या डोंगर ते उभा करीत राहतात. त्यांच्या निष्कर्षाशी, त्यांच्या कार्यपद्धतीशी, आणि त्यांच्या विचारसरणीशी जरी कुणाचे मतभेद झाले, तरी त्यांचे हे वैशिष्ट्य कुणालाही मान्य करावेच लागेल.

आपण सादर केलेल्या पुराव्यानुसार येणारे निष्कर्ष निर्भयपणे मांडणे हे धैर्याचे काम-सुद्धा धोंगडे अगदी सहज करतात. यामध्ये ते प्रथितयश लेखक किंवा नवोदित लेखक असे भेदभाव करीत नाहीत आणि थोरांमोठ्यांच्या नावलौकिकालाही दबत नाहीत. उदा. मर्ढे-करांचे चिंतन मूलगामी आणि भेदक नाही, असे ते पृ. ४३ वर म्हणतात, तर गडकऱ्यांमध्ये नाट्योपहास दाखवण्याची ताकद नाही, असाही एक मुद्दा मांडतात (पृ. ५८) जी. एं.च्या वास्तवनिर्मितीच्या मर्यादित आवाक्याची लक्षणे त्यांच्या उपमा–रूपकांच्या मर्यादित अर्थक्षेत्रात प्रतिबिंबित होतात, असेही ते पृ. १७९ वर नमूद करतात. अशी निर्भय विधाने करण्या-साठी एक courage of conviction आवश्यक असते, ते धोंगड्यांमध्ये भरपूर प्रमाणात आढळते.

त्यांच्या विचारात एक नितळता (clarity) आणि मूलगामितासुद्धा आढळते. उदा. ते जेव्हा ' पंडिती काव्यानंतर केशवसुतांमार्फत एका नव्या वळणाची संस्कृती आणि काव्य-

द्यांचा कालधर्मानुसार तयार झाला. केशवसुत हे त्याचे वाहक होते. म्हणजे व्यक्ती म्हणून केशवसुत आले नसते, तरी तो बदल होणार होता. म्हणून केशवसुतांच्यानंतर त्यांच्याच परंपरेत बालकवीसारखा संयतवृत्तीचा कवी चपखलपणे बसला. उलट मर्ढेकरांची जी काय बंडखोरी होती ती व्यक्तिगत होती, म्हणूनच ' मर्ढेकरांनंतर त्याचे अनुकरण करण्याचे प्रयत्न अयशस्वी झाले.' (पृ. २४) असे म्हणतात, तेव्हा वाचक नकळत त्याच्याशी सहमत होतो. अशी विचारमूलकता त्यांच्या लिखाणात अनेक ठिकाणी दिसते. आता हे खरे, की प्रत्येकच विचाराचा स्रोत त्यांच्यापासून सुरू होतो, असे नव्हे, पण ज्या संदर्भात आणि ज्या जाणिवेने ते हे विचार वापरतात, ते पाहिल्यास इतरांनाही सुचू शकणारे विचार त्यांच्या लिखाणात किती योग्य प्रकारे आलेले आहेत, ते दिसते. उदा. ' केवळ इहवादी लेखकाला शोकांतिका म्हणूनच दूरची वाटते... दलितांचे दुःख आर्थिक, सांस्कृतिक स्वरूपाचे आहे, तर बुद्ध आणि खिस्त धर्माचे दुःख यांच्या चिंता तात्त्विक पातळीवरच्या आहेत. त्याचा मेळ घालता आला तरच दलित साहित्यात शोकांतिका तयार होईल. ' ( पृ. ८७ ) या त्यांच्या विधानामागे ढसाळ आणि अन्य कवींच्या कवितांच्या भाषिक विश्लेषणाची आणि त्यांतून दिसणाऱ्या मनोभूमिकांची पार्श्वभूमी आहे.

## भाग तिसरा

तथापि धोंगड्यांचे काही दोषही महत्त्वाचे आहेत. त्यांच्या विवेचनाला काही वेळा फारच एकांगीपणा येतो. उदा. रामदास हे कवी नव्हते, त्यांची रचना केवळ पद्यमय आहे ( पृ. ८ ), असे ते जेव्हा म्हणतात, तेव्हा त्यांनी रामदासांच्या रामायणातील सृष्टिवर्णने, आनंदवनभुवन, श्रीमंत योगी वगैरेंचा विचार केलेला नाही. अशा प्रकारे वर्ड्स्वर्थच्या काव्याचा विचार करताना त्याच्या अभिजात कृतींचा उल्लेख न करता त्याच्या हिणकस कवितांचेच विश्लेषण केल्यास वर्ड्स्वर्थ सुद्धा कवी नव्हता, असे सहज म्हणता येईल.

काही वेळा त्यांची विधाने अनाठायी येतात. उदा. पृ. ५८ वर ते म्हणतात, की ' भाषेप्रमाणेच नाट्यरचनेचे तंत्रही त्या काळात पहिल्या अवस्थेतील होते, की काय; न कळे. ' या त्यांच्या शंकेला उत्तर म्हणून शारदा, संशयकल्लोळ यांसारख्या नाटकांचा उल्लेख पुरेसा आहे. आणि ज्यांची मृच्छकटिक किंवा विशेषतः मुद्राराक्षसमूशी निदान तोंडओळख आहे, त्यांना स्थितिलक्षी नाटकाचे प्रगत तंत्र आपोआपच उपलब्ध होईल. गडकऱ्यांना तशी नाटके लिहिणे जमले नाही, कारण ते मुळात कवी होते. नाटककार नव्हे. शेक्स्पिअर, येट्स आणि तात्यासाहेब शिरवाडकर यांच्याही नाट्यलेखनात त्यांच्या काव्यात्मतेचा अडथळा आढळून येतोच. तेव्हा गडकऱ्यांच्या बाबतीत काही वेगळे घडले, असे मानायचे कारण नाही.

धोंगड्यांच्या काही विधानांना केवळ तर्काचा आधार असतो, तर काही असमर्थनीय असतात. पृ. ५३ वर ते असा मुद्दा मांडतात, की चिंतनाच्या थिटेपणामुळे मर्ढेकरांना

आहे त्या परिस्थितीत उसने समाधान मानावे लागते. त्यांचा वैताग जागोजागी दिसतो. पण तो 'वांझ' आहे. 'म्हणूनच कदाचित त्यांचा राग भाषिक नियमांची मोडतोड करण्यात व्यक्त होतो. वास्तविक मर्ढेकरांच्या काव्यात आढळणारी भाषिक मोडतोड ही त्यांच्या काव्यतंत्राचा आणि कदाचित त्यांच्या मूलप्रकृतीचा (constitution) भाग आहे. मी १९९० मध्ये असा मुद्दा मांडलेला होता, की रूपक (metaphor) वापरणारे कवी आणि अंगोक्ती (metonymy) वापरणारे कवी यांच्यांत डावऱ्या/उजव्या-खोऱ्या माणसाप्रमाणे काही प्राकृतिकच फरक आहे आणि अंगोक्ती वापरणारे कवीच— ज्यात मर्ढेकर बऱ्याच वेळा आढळतात—बऱ्याच वेळा भाषिक मोडतोड करताना आढळतात. या विषयावर अजून संशोधन होणे आवश्यक आहे, हे खरे; पण माझे मत ग्राह्य असेल, तर मर्ढेकरांचा वैताग आणि त्यांची भाषिक नियमांची मोडतोड यांत कार्यकारण भाव दाखवता येणार नाही. पृ. ४१ वरसुद्धा खालील विधान आढळते, 'मर्ढेकरांनी केलेले नियमोल्लंघन हे सहजपणे स्फुरणाऱ्या काव्याचे लक्षण नाही. त्यात बौद्धिक करामत आहे. जाणतेपणीचा प्रयत्न आहे.' त्यालाही उत्तर हेच, की मर्ढेकरांची कविता काय किंवा 'सहजस्फूर्त' काव्य काय, मुळात काव्य हेच deviation आहे. काही विशिष्ट परिणाम साधण्यासाठी केलेली विशिष्ट भाषारचना असेच त्याचे स्वरूप असते. ज्याला ते सहजपणे स्फुरलेले काव्य म्हणतात, ते साध्य होण्यासाठी त्या कवीला आणि ज्याला ते बौद्धिक कसरत म्हणतात ती करणाऱ्या कवीलासुद्धा उमेदवारीच्या काळात खूप परिश्रम घेणे आवश्यक असते. एकदा पुरेसा सराव झाल्यानंतर मात्र 'सहजस्फूर्त' काव्य जितके सहज स्फुरते, तितक्याच सहजतेने 'बौद्धिक कसरत 'ही स्फुरू शकते. कारण ते त्या लेखकाचा दुसरा स्वभाव (second nature) होते. तेव्हा काय सहजस्फूर्त आहे आणि काय नाही, हे ठरवण्याचा काही नैसर्गिक निकष आपल्याजवळ नाही. आपल्याजवळ आहे, ते हे, की काव्यात प्रत्यक्षात जे आढळते, त्याचा काय परिणाम होतो, ते पाहणे.

दुसऱ्या एके ठिकाणी धोंगडे म्हणतात, 'हे रडणे लोकांचे नाही; असण्याचे कारणही नाही. स्वतःच्या संवेदनेला लेखकाने चढवलेला हा मुलामा आहे.' (पृ. ११८) हे विधान अशासाठी आक्षेपार्ह आहे, की खोतांच्या जळालेल्या वाड्याबद्दल लोकांना काही प्रेम नव्हते, असे धोंगड्यांनी गृहीत धरलेले आहे. त्याला तसा काही आधार नाही. उदा. इंदूरचा राजवाडा जळाल्यानंतर आसपासचे हजारो नागरिक शोकाकुल झाले होते, हा नजीकचाच इतिहास आहे. तेव्हा लेखकाने स्वतःच्या संवेदनेवर मुलामा चढवण्याची काही गरज आहे, असे वाटत नाही.

### भाग चौथा

शैलीवैज्ञानिक चिकित्सेच्या श्रेष्ठतेसंबंधीसुद्धा धोंगड्यांची मते वादग्रस्त ठरू शकतील. तत्त्वज्ञान, समाजशास्त्र यांच्या अंगांनी केलेला साहित्याचा विचार हा बाह्यांगाचा विचार

आहे. साहित्याची साहित्य म्हणून केलेली समीक्षाच आत्मलक्ष्मी समीक्षा होते, असे ते मानतात. यात इतर पद्धतींचा अधिक्षेप करण्याचा त्यांचा हेतू नाही, मात्र त्या गौण आहेत, हे मात्र लक्षात घ्यायला हवे, असे त्यांना वाटते.

पण साहित्याची साहित्य म्हणून होणारी समीक्षाच आत्मलक्षी समीक्षा होते, हे कसे म्हणता येईल ? वास्तविक पाहता शब्द आणि अर्थ, form and content यांचे देह आणि आत्मा यांच्याप्रमाणे द्वैत उभे करायचा प्रयत्न अवास्तव आणि तर्कदुष्ट ठरेल, हे आता बहुतेक सर्वच शैलीवैज्ञानिक मान्य करतात. तेव्हा साहित्याची अमुक एक समीक्षा आत्मलक्षी समीक्षा आहे, तर दुसरी समीक्षा देहलक्षी समीक्षा आहे, असा भेद करणेही अवास्तव आहे. पण मुख्य म्हणजे, त्या आधारावर अमुक एक समीक्षा मुख्य आणि अमुक समीक्षा गौण–म्हणजेच पर्यायाने अमुक एक समीक्षा श्रेष्ठ आणि दुसरी कनिष्ठ ( म्हणजे त्यात अधिक्षेप आलाच ), असेही म्हणता येणार नाही.

वास्तविक पाहता इतर पद्धती वापरूनही कोलरिजसारख्या समीक्षकांनी आपल्यासाठी एक समृद्ध विचारधन वारसा म्हणून मागे ठेवलेले आहे. तेव्हा कोणी कोणती पद्धत वापरावी, हे ज्याने त्याने ज्याच्या त्याच्या प्रकृतिधर्मानुसार ठरवावे. जोपर्यंत त्यातून उच्च विचारधन उपलब्ध होत आहे, तोपर्यंत ती गौण, परलक्षी आहे वगैरे म्हणणे वस्तुनिष्ठ होणार नाही.

किंबहुना याबाबतीत टी. एस्. एलियटने एकदा जे म्हटलेले आहे, ते अतिशय मननीय आहे. एलियटचे म्हणणे असे, की Whether liteature is Great or not cannot be decided by literary criteria alone. But whether it is literature or not can be decided by literary criteria alone. म्हणजे वाङ्मयीन निकषांवर वाङ्मय हे ललित वाङ्मय आहे, की नाही, हे ठरवता येईल, पण केवळ वाङ्मयीन निकष वापरून ते वाङ्मय थोर वाङ्मय आहे, की नाही हे ठरवता येणार नाही.

या विवेचनातून येणारा शेवटचा मुद्दा असा की धोंगड्यानी आपल्या पुस्तकाला ' आत्मलक्षी समीक्षा ' असे जे नाव दिलेले आहे, ते misleading आहे. कारण त्याचा अर्थ **समीक्षालक्षी समीक्षा** असा होईल.

वास्तविक पाहता समीक्षा हे एक जातिनाम ( common noun आहे. त्यात संगीत समीक्षा, चित्रकला समीक्षा, नृत्यसमीक्षा, ललित वाङ्मय समीक्षा वगैरे (विशेषनामांप्रमाणे वाटणाऱ्या नावांच्या ) अनेक उपजाती आहेत. लेखकाला वाङ्मयलक्षी किंवा खरे म्हणजे वाग्व्यवहारलक्षी समीक्षा–अभिप्रेत असल्याने त्यांनी त्याला एकतर शैलीवैज्ञानिक चिकित्सा म्हणावे किंवा सरळ वाङ्मयलक्षी समीक्षा म्हणावे. त्यातील साहित्य, वाङ्मय, शैली ही नामेसुद्धा जातिनामे असली, तरी सुदैवाने सध्या तरी शैलीविज्ञानाचा संबंध ललित वाङ्मयाशीच लावला जातो. अर्थात शास्त्राची परिभाषा जोपर्यंत दृढ होत नाही, तोपर्यंत कोणत्याही





अनुक्रमणिका

शास्त्रशाखेत वाद हे निर्माण होतीलच; पण त्यासाठी आपण सर्वांनीच जास्त काळजी घेण्याची आवश्यकता आहे.

### भाग पाचवा

मतैक्य आणि मतभेदांचा गलबला हा एक तात्कालिक आणि परिस्थितिनिष्ठ घटनांचा परिपाक आहे. ज्याला स्थलकालाचे बंधन नाही, अशा गोष्टी म्हणजे चौकसबुद्धी, अभ्यासू वृत्ती, अथक परिश्रम करण्याची तयारी. तर्क नेईल त्या निष्कर्षापर्यंत निर्भयपणे जाण्याचे धैर्य आणि विचारांची झेप या होत. या सर्व गोष्टी धोंगड्यांमध्ये उदंड प्रमाणात आहेत. त्यामुळे त्यांचे लिखाण, अभ्यासकांना नेहमीच उपयुक्त वाटेल, यात शंका नाही. या दृष्टिकोणातून पाहता त्यांच्या या पुस्तकामुळे मराठी समीक्षा वाङ्मयात एक मोलाची भर पडलेली आहे, यात शंका नाही.

डिपार्टमेंट ऑफ लँग्वेज टीचिंग, एस्. एन्. डी. टी. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०

---

( पान ४४ वरून )

४. वसंत बापट, उपरिनिर्दिष्ट.
5. Roman Jakobson : Selected Writings I, [ Hague: Moulton 1962.
6. I. A. Richards : Practical, Criticism [ London: Routeledge, 1929, pp. 179–83.
7. Ashok Kelkar : To Translate or Not to Translate – A Manuscript.
8. J. C. Catford : A Linguistic Theory of Translation, [ London O. U. P. 1965, p. 93.
9. J. C. Ransom: " Poetry; A Note in Ontology " 1934.
१०. भालचंद्र नेमाडे : साहित्याची भाषा, (औरंगाबाद : साकेत, १९८८.)

प्रतिभा निकेतन महाविद्यालय, नांदेड ४३१६०१.

## महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक : १९८८

पारितोषिक वर्षाच्या आधीच्या दोन वर्षांतील भाषाविषयक सर्वोत्कृष्ट लेखन निवडून त्याला रु. १०००/–चे पारितोषिक देण्याचा उपक्रम महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने मराठी अभ्यास परिषदेने १९८३ पासून योजला आहे.

या उपक्रमानुसार १९८८ च्या पारितोषिकासाठी १९८६ व १९८७ या दोन वर्षांतील भाषाविषयक लेखनांची छाननी करून त्यातील सर्वोत्कृष्ट लेखनाची निवड या पारितोषिकासाठी नियुक्त निवड समितीने केली आहे. त्यानुसार १९८८ चे पारितोषिक डॉ. भालचंद्र नेमाडे यांना त्यांच्या 'साहित्याची भाषा' (साकेत प्रकाशन, औरंगाबाद, १९८७) या ग्रंथाकरिता देण्याचा निर्णय घेतला आहे.

निवड समितीचे सभासद म्हणून श्रीमती आशा मुंडले, डॉ. दत्तात्रय पुंडे व डॉ. गं. ना. जोगळेकर (निमंत्रक), यांनी काम पाहिले.

डॉ. भालचंद्र नेमाडे यांचं अभिनंदन.

## नवलेखक अनुदान योजना

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने नवलेखकांना उत्तेजन मिळावे, म्हणून त्यांच्या प्रथम व द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्याच्या योजनेखाली नवलेखक/कवींकडून साहित्य मागवण्यात येत आहे. नवलेखक/कवी या संज्ञेत, ज्याचे एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही किंवा ज्याचे पहिले पुस्तक मंडळाच्या या योजनेतील अनुदानाने प्रकाशित झालेले आहे, अशाच नवलेखक कवींचा समावेश करण्यात येतो. या योजनेतून अनुदान प्राप्त करू इच्छिणाऱ्यांनी अधिक माहितीसाठी 'सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, एल्फा हटमेंट 'डी ब्लॉक', आझाद मैदान, महापालिका मार्ग, मुंबई ४००००१' या पत्त्यावर संपर्क साधावा. अर्जाचा नमुना व माहितीपत्रक, इ. साठीही याच पत्त्यावर संपर्क साधावा, असे मंडळाचे सचिव श्री. पंढरीनाथ पाटील कळवतात.

## एक निवेदन

सर्वच क्षेत्रांत वाढलेल्या महागाईमुळे खर्चाची तोंडमिळवणी करण्यासाठी आम्हांला मराठी अभ्यास परिषदेची सभासदत्व–वर्गणी आणि 'भाषा आणि जीवन' या तिच्या

(पृ. ३२ वर पाहा)

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक ' मराठी अभ्यास परिषद ' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिट्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते. :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद-वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षांपैकी असो) १५ रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी

समान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक एक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रुपये भरावे लागतील.

आजीव सभासत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी १०० डॉलर) हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु. अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु. आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठी असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक 040048/83

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने

# संगणक आणि मराठी भाषा

प्रदर्शने आणि चर्चासत्र

पुणे येथे जूनमध्ये झाले त्यानिमित्त प्रकाशित झालेली

## पुस्तिका

**आता उपलब्ध आहे.**

मॅक्सीन बर्न्सन, अशोक रा. केळकर, निनाद माटे,
कूपर– जोशी– चितळे, अर्जुनवाडकर, गायकैवारी
यांचे माहितीपूर्ण व विचारप्रवर्तक लेख

वि. द. आपटे यांची संगणक परिभाषा (इंग्रजी–मराठी)
पुण्यातील संगणक शिक्षणाच्या सोयींची एक उपयुक्त सूची

**किंमत ५ रुपये**

**संपर्क**
मराठी अभ्यास परिषद, द्वारा अक्षरछाया,
२०३५ सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे ४११ ०३०